# नवभारत

## जानेवारी २००९

---




२ जानेवारी ०८
मुंबई

प्रिय श्री. बर्वे,

सप्रेम नमस्कार. माझ्या लिखाणात कुणाचाच रस नव्हता तेव्हा तुम्ही त्याचा गंभीर विचार केलात!
मला जे येतं ते शोधतच ते आलो आहे.
फोन ९८२११-२७२५५.

आपला,
[illegible]

अनुक्रमणिका










नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६२ । अंक ४ । जानेवारी २००९
पौष/माघ शके १९३०
वार्षिक वर्गणी ३०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २५/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.





संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).



अनुक्रमणिका








# नवभारत
जानेवारी २००९

अनुक्रमणिका



## लेखकांचा परिचय

 **प्रा. म. अ. मेहेंदळे**

माजी प्राध्यापक, संस्कृत विभाग व माजी सहयोगी प्रमुख संपादक, संस्कृत कोश विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे; संपादक, महाभारताचा सांस्कृतिक कोश, भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, पुणे. वैदिक वाङ्मयातील प्रश्नोत्तरे (१९८०), भारतीय द्यूत (१९९०), पू. विनोबा-कृत ऋग्वेद-सारचे मराठी भाषांतर (१९८२), जरथुस्त्राच्या गाथांचे मराठी भाषांतर (१९९४), या ग्रंथांचे लेखक; नवभारतांत लेखन.

*पत्ता :* बी-४, प्रबोधन हाऊसिंग सोसायटी, ६१ ए/९-१०, कर्वे रोड, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

 **प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे**

स. प. महाविद्यालय पुणे येथे मराठीचे विभागप्रमुख व प्राध्यापक.

*पत्ता :* बी ४/३, पी डब्ल्यूडी सोसायटी, रामबाग कॉलनी, नवी सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०.

 **श्री. राजीव साने**

एम. ए. सोशॉलॉजी, कामगार संघटनेच्या उत्पादकता वाढविण्यासंबंधीच्या समितीचे विशेष सल्लागार, आर्थिक सुधारणांचा सकारात्मक दृष्टिकोणातून अभ्यास. तत्त्वज्ञानाची विशेष आवड. प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या चर्चासत्रांमध्ये विशेष सहभाग; त्यांच्या 'युगांतर' या पुस्तकाला राज्य पुरस्कार मिळाला आहे.

*पत्ता :* २, स्नेह क्लासिक्स, जोशी पथ, पाडळे पॅलेससमोर, ७/१, एरंडवणे, पुणे - ४११ ००४.

# तेंडुलकरांवरील नाट्यचौर्याचा आरोप

प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे




**आजचे प्रास्ताविक**

पुढे छापलेला लेख म्हणजे १९७७ मध्ये, पुणे विद्यापीठाने Ph.D. साठी स्वीकारलेल्या माझ्या प्रबंधासाठी लिहिलेले आणि १९८५ मध्ये पुण्याच्या 'राजहंस प्रकाशना'ने प्रसिद्ध केलेल्या, माझ्या प्रबंधावर आधारित असलेल्या, पुस्तकात छापले गेलेले प्रकरण होय.

या विषयावर इतके अभ्यासपूर्वक व पद्धतशीर आणि वस्तुनिष्ठ तौलनिक व साधकबाधक चर्चाप्रवण लेखन, उडत-पागडत, निसटते आरोप-वार करणाऱ्या टीकाकारांनीही (खरे म्हणजे टीकाखोरांनीही) केलेले, माझ्या वाचनात आजतागायत आलेले नाही. यामुळेच, तीस वर्षांनंतरही त्याचे महत्त्व अभ्यासकांसाठी अबाधित राहिले आहे, असे मला प्रामाणिकपणे वाटते; आणि म्हणूनच 'नवभारत'सारख्या प्रतिष्ठाप्राप्त मासिकाच्या संपादकांना माझे मूळ लेखन पुनर्मुद्रित करण्यासाठी मी दिले आहे.

माझ्या मतांत काहीही बदल झालेला नसल्यामुळे ते मुळात होते तसेच आताही ठेवले आहे; संदर्भ व संदर्भसूची यांत मात्र क्रमांकापुरते बदल केले आहेत.

आणखी एक - १९ मे २००८ रोजी, विजय तेंडुलकर काळाच्या पडद्याआड गेले. त्यानंतर त्यांचे स्मरण जागवणारे, त्यांना आदरांजली अर्पण करणारे बरेच लेख प्रकाशित केले गेले. त्यांपैकी दोन लेखांतून 'गिधाडे' नाटकाबद्दल लिहिलेले दिसून आले (तीस वर्षांपूर्वी ते कुजबुजीसारखे बोलले गेल्याचे कै. तेंडुलकरांनी स्वतःच मला एका प्रत्यक्ष भेटीत मोकळेपणाने सांगितले होते).

सदर दोन लेखांची दखल, या लेखाच्या शेवटी, 'ताजा कलम' लिहून, थोडक्यात पण गंभीरपणे घेतली आहे.

आजचे म्हणून लिहिलेले हे प्रास्ताविक एवढे पुरेसे ठरावे.

□□□

तेंडुलकरांच्या काही नाटकांवर, उघड किंवा आडून चौर्याचा आरोप केला गेला आहे; अर्थात तो गंभीर आहे. मूळ नाटके व तेंडुलकरांची (संशयित) आरोपी नाटके यांची तुलना करून आरोपाचा सोक्षमोक्ष करणे सहज शक्य आहे. तेव्हा तेंडुलकरांच्या काही नाटकांवरील चौर्याच्या आरोपाची दखल अगदी खाराखिरीने घेऊ.

आरोपाची कल्पना पुढील अवतरणांवरून येईल – "उधार-उसनवारचा मामला! (तेंडुलकरांची) स्वतंत्र नाटके पडली, गाजली ती परभृत आहेत."[१] श्री. दीनानाथ लाटे. "तेंडुलकरांच्या नाट्यकृतीत त्यांचे स्वतःचे किती आणि पाश्चात्त्य नाटककारांचे किती, हे समजणेच दुरापास्त आहे."[२] श्री. माधव मनोहर. काही नाटकांवरील आरोप तोंडी, मोघम आहेत. उदाहरणार्थ – - 'माणूस नावाचे बेट', 'गिधाडे' यांवरील आरोप. काही नाटकांवरील लेखी व स्पष्ट आहेत. उदाहरणार्थ – 'श्रीमंत', 'शांतता ....', 'अशी पाखरे ....', 'घाशीराम कोतवाल' यांवरील आरोप. तोंडी आरोप बिनबुडाचे असल्यामुळे विचारासाठी घेण्यात अर्थ नाही. पण लेखी आरोपांचा परामर्श मात्र सविस्तर घ्यावयास हवा.

'श्रीमंत' हे नाटक पिरांदेलोच्या नाटकावरून ('प्लेझर ऑफ ऑनेस्टी' वरून) तेंडुलकरांनी तयार केले असे श्री. माधव मनोहर यांनी पहिल्यांदा लिहिले असले.[३] तरी नंतर लिहिताना मात्र "आरोप केवळ चौर्याचाच नाही तर पिरांदेलोच्या नाट्यकृतीच्या हत्येचा–

अनुक्रमणिका

खुनाचा आहे", "मूळ आक्षेप चौर्याबद्दल नाही तर मूळ कृतीच्या विकृतीबद्दल आहे", असे पुन्हा पुन्हा ठासून सांगितले आहे.[४] 'प्लेझर ऑफ ऑनेस्टी' व 'श्रीमंत' या दोहोंची तुलना करून झाल्यावर मग मनोहरांनी लिहिले आहे – "दोन्ही नाटकांतील प्रमुख घटना प्रायः एकरूप आहेत; मात्र अंतरंगी या नाटकांचे विषयाशय संपूर्णतः भिन्न आहेत."[५] समारोप करताना मनोहरांनी म्हटले आहे – "तात्पर्य, पिरांदेलोच्या मूळ नाटकाचा फक्त सांगाडा काय तो तेंडुलकरांनी उचलला आहे; पण त्या सांगाड्याला सचेतन करणारे चैतन्यतत्त्व मात्र ते हरवून बसले आहेत. म्हणून मी म्हटले की हे केवळ वाङ्मय चौर्यच नाही, तर ही वाङ्मयहत्या आहे."[६]

श्री. मनोहर यांची सगळी विधाने एकत्र लक्षात घेता असे वाटते की वाङ्मयहत्येच्या आक्षेपाच्या बाबतीत ते जितके ठाम आहेत तितके चौर्याच्या आरोपाच्या बाबतीत नाहीत. मनोहर संपूर्णपणे निश्चयात्मक असते तर त्यांना काहीशा उलटसुलट विधानांची कसरत करांवी लागली नसती! पण मनोहरांची कसरत हा मुख्य विवाद्य विषय नाही, तर पिरांदेलोचे नाटक व तेंडुलकरांचे नाटक या दोहोंतील साम्यभेद हा मुख्य, वादग्रस्त विषय आहे. तेव्हा 'प्लेझर ऑफ ऑनेस्टी' व 'श्रीमंत' या दोन नाटकांची तुलना करून पाहणे हेच केव्हाही श्रेयस्कर होय.

तत्पूर्वी, आरोपाचा गदारोळ उठल्यावर, तेंडुलकरांनी जो खुलासा केला होता, तो डावलून चालणार नाही. अगोदर आपणहून केलेला तोंडी ऋणनिर्देश, नंतर सकारण केलेला इन्कार, मागाहून गुन्हा विशिष्ट मर्यादेपर्यंतच दिलेला कबुली-जबाब, या सगळ्या सव्यापसव्यानंतर तेंडुलकरांनी लिहिले आहे – "वरील स्पष्टीकरणावरून कोणास असे वाटले की पिरांदेलोचे श्रेय त्या नाटकात ('श्रीमंत'मध्ये) मोठे आहे, तर त्याला माझी मुळीच हरकत नाही; हरकत मूळ नाटकाचा चुथडा केला, पिरांदेलोमुळे माझे नाटक परिणामकारक ठरते, या म्हणण्याला आहे."[७] यावर दोन प्रश्न उपस्थित होतात – १) 'श्रीमंत'च्या रचनेत 'प्लेझर ऑफ ऑनेस्टी' चा हातभार किती आहे? २) 'श्रीमंत'-च्या यशापयशाशी 'प्लेझर ऑफ ऑनेस्टी' चा संबंध खरोखर काय आहे? दोन्ही नाटकांची तुलना केल्यावर हे प्रश्न सहज सुटतील.

स्थूल दृष्टीने बघितले तर 'प्लेझर ऑफ ऑनिस्टी'[८] व 'श्रीमंत'[९] या दोन्ही नाटकांत एक गोष्ट समान आहे असे दिसून येते. ही गोष्ट म्हणजे कुमारी माता होऊ घातलेल्या एका तरुणीला (अनुक्रमे ॲगाटा व मथुरा) अडचणीतून सोडवण्यासाठी, एक 'इन्स्टन्ट' नवरा व बाप (अनुक्रमे बाल्डोविनो व श्रीधर) घरात शिरल्यावर, निर्माण होणारे नाट्य. सूक्ष्म दृष्टीने बघितले तर ध्यानात येते की हे नाट्य ज्या आंतरक्रियेतून निर्माण होते ती मात्र वरीलपैकी प्रत्येक नाटकात वेगळी आहे. 'प्लेझर ऑफ ऑनेस्टी' मधील आंतरक्रिया, फॅबियो (ज्याच्यापासून गर्भ राहतो तो) व बाल्डोविनो (ज्याच्या नावाने तो वाढवावयाचा असतो तो) या दोघांच्या संबंधावर प्रामुख्याने आधारलेली आहे. 'श्रीमंत' मधील आंतरक्रिया, दादा (मथुरेचे वडील) व श्रीधर (मथुरेचा नियोजित आश्रयदाता, उपकारकर्ता) यांच्या संबंधावर प्रामुख्याने आधारलेली आहे.

स्थूल मानाने असे म्हणता येईल की दोन्ही नाटकांतील प्रधान पात्रव्यूहात थोडासा सारखेपणा आहे. एक दुर्दैवी तरुणी (ॲगाटा व मथुरा), तिच्यासाठी सुटकेचा मार्ग शोधू पाहणारी तिची आई (मॅडालेना व मालिनीबाई), सोडवणुकीसाठी कोण्या उपऱ्याला धरून आणणारा एक मध्यस्थ (मॉरिझियो व डॉक्टर) आणि तो उपरा (बाल्डोविनो व श्रीधर) याप्रमाणे परंतु सूक्ष्मपणे म्हणावयाचे तर प्रधान पात्रव्यूहात भेदही तितकाच आहे. ज्याच्यापासून गर्भ राहतो तो फॅबियो 'प्लेझर ....' मध्ये आहे, 'श्रीमंत' मध्ये नाही. दुर्दैवी तरुणीचे वडील, भाऊ व भावजय (दादा, भाऊ व रत्ना) हे निकटचे आप्त 'श्रीमंत'मध्ये आहेत, 'प्लेझर .....' मध्ये नाहीत – याप्रमाणे.

पात्रव्यूहापेक्षा पात्रस्वभावांची पाहणी ही






अधिक महत्त्वाची होय. दोन्ही नाटकात समान असलेल्या पात्रांची पाहणी केली तर असे निदर्शनाला येते की आई मॅडालेना व मालिनीबाई, मध्यस्थ मॉरिझियो व डॉक्टर आणि 'इन्स्टन्ट' नवरा व बाप बाल्डोविनो व श्रीधर यांच्या स्वभावात, भूमिकात बरेच साम्य आहे. पण मुख्य व्यक्तिरेखांत सर्वस्वी साम्य मुळीच नाही. बाल्डोविनोपेक्षा श्रीधर खूप ओबडधोबड आहे. ॲगाटापेक्षा मथुरा बरीच आक्रमक आहे. मुख्य व्यक्तिरेखांत ठळकपणे दिसणारा भेदच येथे नमूद केला आहे; पण आणखी बारीकसारीक भेदही आहेत.

काही प्रसंग पिरांदेलो व तेंडुलकर या दोघांच्याही नाटकांत सारखे आहेत. बाहेरून नवरा-बाप आयात करण्याचा प्रसंग, मुलाचे नाव ठेवण्याचा (बाप्तिस्मा-बारसे) प्रसंग व दुर्दैवी तरुणीने आयात नवऱ्याबरोबर घराबाहेर पडण्याचा प्रसंग. यांत अगदी तंतोतंत सारखेपणा आहे, असे मात्र म्हणता येणार नाही. नाव ठेवण्याच्या प्रसंगी मतभेद होतो तो, 'प्लेझर ...' मध्ये, नाव कोठे ठेवावयाचे याही प्रश्नावरून. तर 'श्रीमंत' मध्ये नाव कोणते ठेवावयाचे याच प्रश्नावरून फक्त. ॲगाटा घराबाहेर पडण्यास तयार होते ती अधिककरून माणुसकीपोटी, तर मथुरा तयार होते ती बाळाला बाप पाहिजे ..... म्हणून अंगतिकतेपोटी. मुळातच वेगळे असलेले प्रसंग दोन्ही नाटकांत जास्त आहेत. उदा. काही ठळक प्रसंग - 'प्लेझर ....' मध्ये ॲगाटा पहिल्या अंकात वावरते. 'श्रीमंत'मध्ये मथुरा पहिल्या अंकाच्या अखेरीस ओझरती येते. 'श्रीमंत'च्या दुसऱ्या अंकाचा आरंभ (भाऊ व रत्ना यांच्या तणातणीने होणारा) व शेवट (श्रीधरचा मित्र केशव-नुकताच तुरुंगातून सुटून आलेला-याच्या बाबतीतील तणातणीने होणारा) हे पूर्णपणे स्वतंत्र आहेत. (म्हणजे 'प्लेझर...'शी त्यांचा काडीचाही संबंध नाही.) 'प्लेझर ....'च्या तिसऱ्या अंकात बाल्डोविनोवर चोरीचा आळ येतो, ते प्रकरण 'श्रीमंत'मध्ये नाही. तर 'श्रीमंत'च्या तिसऱ्या अंकात असलेले संप-प्रकरण व कृष्णा बाणावलीवरचे प्रकरण 'प्लेझर ...'मध्ये नाही. तात्पर्य, दोन्ही नाटकांतील प्रसंगांत वेगळेपणा बराच आहे.

'प्लेझर ....' मधील संवादांतील काही वाक्ये व 'श्रीमंत'मधील संवादांतील काही वाक्ये यात सादृश्य जरूर आहे. उदाहरणार्थ, पुढील वाक्यांच्या जोड्या –

(१) Maurizio : He's here. ('प्लेझर...' पृ. ९४)

डॉक्टर : होय, तो आला आहे. ('श्रीमंत' पृ. १)

(२) Maddalena : What sort of a person is he? ('प्लेझर ....' पृ. ९५)

मालिनी : स्वभावानं कसा आहे तो? ('श्रीमंत' पृ. २)

(३) Maurizio : I thought she had approved of the idea herself. (पृ. ९७)

डॉक्टर : हो, तिला मान्य आहे सगळं. (पृ. ७)

(४) Maurizio : From now we must control ourselves, we must stand together. (पृ. १००, १०९)

डॉक्टर : एक खरं की अत्यंत सावधपणं, संयमानं आणि एकजुटीनं तोंड देणं जरूर आहे त्याला. (पृ. ८)

(५) Baldovino : I have also a certain self-respect, (पृ. ११२)

श्रीधर : माणसाची किंमत काय हजारांनी करता तुम्ही? (पृ. १८)

या झाल्या पहिल्या अंकातील काही जोड्या; आता दुसऱ्या अंकातील काही –

(१) Maurizio : How are things going? (१२४)

डॉक्टर : श्रीधरपंतांचं कसं काय चाललंय इथं? (३८)

(२) Baldovino : I insist that it be celebrated in due form! (१३६)

श्रीधर : निदान माझ्या मुलाचं नाव माझ्या आवडीप्रमाणं ठेवलं गेलं पाहिजे. (४४)

तिसऱ्या अंकात अशा जोड्या आढळत नाहीत.

वर उद्धृत केलेल्या जोड-वाक्यांवरून कोणाही सुज्ञाच्या लक्षात यावे की या वाक्यांत सादृश्य असले तरी ही भाषांतरित वाक्ये मुळीच नव्हेत. वाक्यांतील सादृश्यावरून 'प्लेझर...' ची कॉपी तेंडुलकरांनी 'श्रीमंत'मध्ये केली आहे, असे जर कोणाला वाटू लागले, तर ती फार मोठी फसगत होईल. 'प्लेझर....' एका हातात व 'श्रीमंत' दुसऱ्या हातात असे वाचन केले तरी तत्काळ कळून चुकेल की 'प्लेझर...'च्या संवादांशी 'श्रीमंत'च्या संवादांचा जवळचाच काय, पण दूरचासुद्धा संबंध नाही. शिवाय 'प्लेझर....'च्या संवादांपेक्षा 'श्रीमंत'चे संवाद जास्त त्रुटित आहेत. त्यांची भाषाही अधिक तीक्ष्ण आहे. असे असल्यामुळेच 'प्लेझर...' व 'श्रीमंत' यांतील सारखी वाक्ये शोधत बसण्याला शेवटी फारसा अर्थ उरत नाही.

'श्रीमंत'मधील संवाद, भाषा यांत वेगळेपणा असण्याचे कारण हे की 'श्रीमंत'ची उभारणीच निराळी आहे. 'प्लेझर....'च्या उभारणीशी काही बाबतीत साम्य असले तरी ती स्वतंत्र आहे. दादा व श्रीधर यांच्या अस्मितांतील झगड्यावर 'श्रीमंत'ची उभारणी आहे. त्यामुळेच 'प्लेझर.....' पेक्षा 'श्रीमंत'चा परिणाम अगदी निराळा होतो. शिवाय तो जास्त गतिमान व काहीसा भडकही असल्याचे लक्षात येते.

आतापर्यंत केलेल्या तुलनात्मक विवेचनाचा निष्कर्ष असा — पिरांदेलोच्या नाटकाशी तेंडुलकरांच्या नाटकाचे कोठे कोठे साम्य आहे हे खरे; पण ते स्थूल आहे आणि तेही सर्वस्वी नाही हे देखील तितकेच खरे. तेव्हा पिरांदेलोची चोरी तेंडुलकरांनी केली असे म्हणणे धाष्ट्र्याचेच ठरेल. फार तर, आवश्यक तो ऋणनिर्देश, वेळीच लेखी रूपात केला नाही, म्हणून थोडा दोष दाखवता येईल. तसेच तेंडुलकरांचे 'श्रीमंत' ही स्वतंत्र रचना असल्यामुळे, त्याची पिरांदेलोच्या 'प्लेझर ऑफ ऑनेस्टी'शी तुलना करणे आणि मूळ नाटकाचा तेंडुलकरांनी विचका केला असे म्हणणे किंवा मूळ नाटकाचा आधार आहे म्हणून तेंडुलकर प्रभावी लिहू शकले असे म्हणणे केवळ धाष्ट्र्याचेच नव्हे तर चुकीचेही ठरेल.

'शांतता! कोर्ट चालू आहे' या नाटकावरही पहिल्यांदा चौर्याचा आरोप श्री. माधव मनोहर यांनीच केला— "पिरांदेलोच्या 'सिक्स कॅरॅक्टर्स..' या सुप्रसिद्ध नाट्यकृतीशी या 'कोर्ट' नाटकाचे नाते तसे जवळिकीचे होते."[१०] पुढे (बहुधा प्र. ना. परांजपे यांच्या परीक्षणावरून) मनोहरांच्या लक्षात आले असावे की आपला आरोप चुकीच्या दिशेला गेला; तेव्हा त्यांनी (चुकीची कबुली न देता, पण चूक दुरुस्त करून) म्हटले — "माझी खात्रीच पटली की 'शांतता....'चा मूलधार 'डेंजरस गेम' हाच होय."[११] येथेही पुन्हा 'शांतता....' म्हणजे 'डेंजरस गेम'चा अप्रामाणिक, विकृत, भ्रष्ट अनुवाद, असे म्हणून चौर्याचा आरोप मनोहरांनी डळमळीत करून ठेवला आहेच. 'डेंजरस गेम' वाचल्याचा उल्लेख त्यांनी केला असला तरी ते पुरेसे वाचून झाले नसावे! म्हणूनच, तिसऱ्यांदा लिहितानासुद्धा, 'प्लेझर ऑफ ऑनेस्टी' व 'श्रीमंत' यांची केली तशी, 'डेंजरस गेम' व 'शांतता ....' यांची तुलना त्यांनी केली नाही. आणि तरीदेखील (जणू काही, दोन नाटकांबद्दल आपण अगोदर बरेच लिहिले आहे, अशा थाटात) "....जे 'श्रीमंत' विषयी म्हटले तेच काही अंशी 'शांतता...' विषयी म्हणता येण्यासारखे आहे. पण आता त्या संबंधात अधिक काही लांबण लावत नाही."[१२] श्री. मनोहर यांचे 'शांतता....' बद्दलचे सारेच लिहिणे कच्च्या पायावर आधारलेले दिसते!

कालक्रम लक्षात घेता, श्री. मनोहर यांच्या आधी (दहा महिने), प्रा. प्र. ना. परांजपे यांनी 'शांतता....' वर 'डेंजरस गेम'ची छाया असल्याचे सूचित करून ठेवले होते,[१३] असे दिसून येते. परांजपे यांनी चौर्याचा आरोप केलेला नव्हता. पण जे सूचित करून ठेवले, त्यामुळे वादाला तोंड फुटले. हे दिसून आल्यावर, 'मीच हे सांगितलं पाहिजे' असे म्हणून त्यांनी

अनुक्रमणिका

जे लिहिले त्यात आपल्या मर्यादित आक्षेपाचा पुनरुच्चार करताना त्यांनी एवढेच म्हटले— "यात (वरील–टीप क्र. १३ परीक्षणात) 'शांतता....' हे नाटक स्वतंत्र आहे; पण मूळ कल्पनेच्या व कलाकृतीच्या तुलनेने ते फार कमी पडते, असा मुद्दा मांडला होता."[१४] प्रा. परांजपे यांनी चौर्याचा आरोप केलेला नसला तरी तेंडुलकरांनी मूळ कृतीचा कौशल्यपूर्ण उल्लेख केल्याबद्दल आश्चर्य व्यक्त केलेलेच आहे. मूळ कृती–ड्युरेनमातची 'डेंजरस गेम' ही कादंबरी – (की दीर्घकथा ?) व तेंडुलकरांचे नाटक – 'शांतता....' यांची तुलना मात्र त्यांनी करून दाखवलेली नाही. (आपले 'शांतता.....' चे परीक्षण 'मराठा' मध्ये प्रसिद्ध झाले, तेव्हा त्यामधूनच 'डेंजरस गेम' चा परिचय करून देण्यास आपण तयार होतो, पण 'मराठा'च्या सौ. पै तयार नव्हत्या, असे प्रा. परांजपे यांचे म्हणणे आहे.[१५])

तेंडुलकरांना 'ट्रायल'साठी उभे करून, ड्युरेनमातला न्याय देण्याचा प्रामाणिक प्रयत्न, अशी भूमिका घेऊन, श्री. प्रकाश गुप्ते यांनी 'शांतता! तेंडुलकर चालू आहेत!' हा लेख लिहिला. (यालाही प्रसिद्धी देण्यास प्रथम कोणी पत्रकार तयार नव्हते म्हणे!) या लेखात 'ट्रॅप्स'चा (म्हणजे 'डेंजरस गेम'च्याच अमेरिकन भाषांतरित आवृत्तीचा) परिचय करून देऊन शेवटी श्री. गुप्ते यांनी लिहिले आहे – "एकंदर तेंडुलकरांच्या ('शांतता.....' च्या) प्रस्तावनेचेच तंत्र फार उत्कृष्ट आहे. तेंडुलकरांनी विषय–कल्पना, व्यक्तिरेखा व तंत्र यांचे श्रेय ड्युरेनमातला वगळून इतरांना दिले आहे की ज्यांच्याकडून त्यांनी फारच थोडे उचलले आहे."[१६] म्हणजे तेंडुलकरांनी ड्युरेनमात-कडूनच बरेच उचलले आहे हा श्री. गुप्ते यांच्या विधानाचा रोख !

'शांतता ! टीकाकार चालू आहे !' असे म्हणून तेंडुलकरांनी काही प्रत्युत्तरादाखल लिहिले. त्यांचे म्हणणे, 'डेंजरस गेम' हे 'शांतता....' चे 'मूळ' नव्हे ! तरीही, दोहोंत 'तांत्रिक साम्य' असल्याचे ते कबूल करतात; आणि 'इतरांबरोबर त्याचाही उल्लेख' केल्याचे सांगतात.[१७] श्री. गुप्ते यांचे निष्कर्ष 'तर्कशुद्ध' असले तरी 'चुकीचे' आहेत, असे तेंडुलकरांचे म्हणणे आहे.[१८] त्यांचा एक खुलासा – "मी 'डेंजरस गेम' वाचले होते ते मूळ रूपात नव्हे, तर त्या कादंबरीवर आधारित नभोनाट्य रघुनाथ तेंडुलकर–वडीलबंधू–यांनी रांगणेकरांसाठी–म्हणजे रेडिओसाठी–लिहिले होते, ते मला दाखवले होते. मला ते वेधक वाटले होते."[१९] 'डेंजरस गेम'चे अल्पांश ऋण–अर्थात तंत्राच्या बाबतीत – 'शांतता....' वर असल्याचे तेंडुलकर मान्य करतात; पण दोहोंचा भर भिन्न बाबींवर आहे, तो लक्षात घेतला जावा, असेही ते सुचवतात. प्रा. प्र. ना. परांजपे यांनी, या संदर्भातील म्हणून तेंडुलकरांचे शब्द उद्धृत केले आहेत ते असे – "ड्युरेनमातने नैतिक आस्पेक्टवर भर दिला आहे; माझा भर सामाजिक आस्पेक्टवर आहे."[२०] एकूण 'शांतता...'च्या संदर्भातील तेंडुलकरांचे सारेच म्हणणे लक्षणीय वाटते. अर्थात ते तपासून घेतले पाहिजे.

त्याचबरोबर तेंडुलकरांच्या बाजूने असलेली श्री. सत्यदेव दुबे यांची साक्षही तपासून घेतली पाहिजे. दुबे यांची साक्ष पुढीलप्रमाणे – "तेंडुलकरांचे 'शांतता.....' हे नाटक स्वतंत्र नाही, या गैरसमजाने मला यातना होतात. 'डेंजरस गेम' कादंबरी, तसेच तिचे नाट्यरूप, इंग्रजीत वाचल्यावर, मला अशा निष्कर्षास यावे लागले की एक तर लोक मूळ इंग्रजी पुस्तके वाचत नसावेत अगर वाचत असल्यास, उघडच त्यांना त्या भाषेची नीटशी जाण तरी नसावी. तेंडुलकरांचे हे नाटक हे भारतीय वास्तव आणि नाट्यमाध्यमातील या वास्तवाची अर्थपूर्ण अभिव्यक्ती यांचा जमलेला संयोग आहे."[२१] 'शांतता.....' ची 'डेंजरस गेम'शी तुलना करून, इतकेच नव्हे तर, त्याच्याशी व इतरही काही साहित्यकृतींशी असलेले साम्य जमेला धरून मगच दुबे यांनी वरील उद्गार काढले आहेत. एका अधिकारी नाट्यवेत्त्याचे हे उद्गार असले तरी ते तपासून बघितल्याशिवाय त्यांच्यावर विसंबून चालणार नाही.

ड्युरेनमातच्या 'डेंजरस गेम' चे[२२] किती ऋण

तेंडुलकरांच्या 'शांतता....' वर" आहे? पहिल्याच्या तुलनेने दुसरे (समजा स्वतंत्र असले तरी) खरोखर कमी पडते काय? या दोन प्रश्नांचा नीट निकाल करावयाचा असेल तर दोहोंची बारकाईने तुलना करून पाहिली पाहिजे. ही तुलना करताना, 'डेंजरस गेम' ही मुळात कादंबरी (खरे म्हणजे दीर्घकथा) आहे व 'शांतता.....' हे नाटक आहे याचे भान ठेवावयास हवे.

प्रथमदर्शनी दोहोंत एक गोष्ट समान असलेली आढळते; ती म्हणजे काल्पनिक खेळातून हळूहळू उघड होत जाणारे खरेखुरे सत्य. बारीक नजरेने बधितले म्हणजे लगेच कळून चुकते की हे ज्या पद्धतीने व ज्या वातावरणात घडते ती पद्धत व ते वातावरण दोहोंत समान नाही. 'डेंजरस गेम'मध्ये शेवटपर्यंत खेळीमेळी कायम आहे; 'शांतता....' मध्ये उत्तरोत्तर क्रूरपणा वाढत गेला आहे. दोहोंत असलेला हा भेद उपेक्षणीय तर नाहीच; उलट त्याची कारणमीमांसा करणे भाग आहे.

बाह्यात्कारी दोहोंतील पात्रव्यूहात बरेच साम्य आहे असे दिसून येते–आरोपी ('डेंजरस गेम' मध्ये ट्रॅप्स, 'शांतता...' मध्ये बेणारे), फिर्यादीचा वकील (अनुक्रमे झोर्न, सुखात्मे-१), बचावाचा वकील (कम्मर, सुखात्मे--२), न्यायाधीश (होस्ट, काशीकर) असे साम्य असले तरी दोहोंतील पात्रव्यूहात असलेला भेद कोणाही डोळसाच्या लक्षात येण्याजोगा आहे – 'डेंजरस गेम' मध्ये पायलेट ही एक तटस्थ व्यक्ती आहे – खातखात चवीने खेळात रस घेणारी; अशी व्यक्ती 'शांतता....' मध्ये नाही. उलटपक्षी, पोंक्षे, सामंत, कर्णिक, रोकडे, सौ. काशीकर ही खास मासलेवाईक मंडळी 'शांतता....'मध्ये आहेत; तशी 'डेंजरस गेम'मध्ये अजिबात नाहीत.

पात्रांच्या अंतर्यामाकडे वळले की साम्यापेक्षा भेदच जास्त दिसू लागतात. आरोपी ट्रॅप्स व बेणारे यांना काळसर भूतकाळ आहे, तो मागे ठेवून दोघेही वर्तमानात रममाण झालेले आहेत, एवढे साम्य सोडले तर बाकी सगळा भेदच आहे. ट्रॅप्स पुरुष आहे, बेणारे स्त्री आहे, हा भेद, किंवा ट्रॅप्स सेल्स मॅनेजर आहे, बेणारे शिक्षिका आहे, हा भेद, हे तसे वरवरचेच होत. ट्रॅप्स हा पाहुणा म्हणून येतो आणि आपण होऊन आरोपीची भूमिका पत्करतो, उलट बेणारे ही परकी नाही (म्हणूनच तिचे बिंग इतरांना माहीत!) आणि आरोपीची भूमिका तिच्यावर पद्धतशीर लादली जाते (स्वाभाविकपणे इतरांकडून ती घेरलेली!) हा भेद तसा वरवरचा नाही. पण याहीपेक्षा खोल भेद वेगळाच आहे – 'डेंजरस गेम' मधील वकील, न्यायाधीश हे खरोखर खेळातले आहेत, त्यांना खेळात स्वारस्य आहे; आरोपीत असलेच तर तेही फक्त खेळापुरतेच – त्यापरते नाही. त्यामुळेच 'डेंजरस गेम' मध्ये निर्मळपणा, खेळकरपणा अखेरपर्यंत कायम आहे. उलटपक्षी, 'शांतता....' मधील वकील, न्यायाधीश हे बेणारेला घेरण्याकरिता इतरांनी धारण केलेले मुखवटे आहेत; त्यांना खेळापेक्षा खरोखर आरोपीत खोलवर 'इंटरेस्ट' आहे. त्यामुळेच 'शांतता....' मध्ये कुत्सितपणा, खुनशीपणा जास्त आहे, तो सतत वाढतच गेला आहे. दोन्ही साहित्यकृतीत समान असणाऱ्या पात्रांच्या संदर्भात ठळकपणाने डोळ्यात भरणारा भेदच तेवढा येथे दाखवून दिला आहे.

आता घटना-प्रसंगांतील साम्य-भेद. आरोप ठेवणे, चौकशी करणे व शिक्षा फर्माविणे या बाबी दोन्ही साहित्यकृतींत सारख्या आहेत, म्हणजे दोहोंची बाह्य चौकटच काय ती जुळतीमिळती आहे. दोहोंतील सर्व तपशील मुळीच मिळता-जुळता नाही. ठळक भेद पुढीलप्रमाणे दाखवता येईल – 'डेंजरस गेम' मध्ये ट्रॅप्सची मोटार बंद पडते म्हणून तो रात्रीपुरता एका निवृत्त 'लॉयर' च्या घरी आसरा घेतो, तेथे नेहमी चालणाऱ्या 'मॉक ट्रायल' मध्ये आपखुशीने सामील होतो. जेवण घेता घेता मजेत 'ट्रायल' सुरू होत जाते. याची जाणीवही ट्रॅप्सला अगोदर नसते, होते तेव्हा खिलाडू वृत्तीनेच आपली भूमिका तो बजावतो. शेवटी आपण खरोखर दोषी आहोत हे सिद्ध झाल्यावर तो आपण होऊन शिक्षेची तामिली करतो-आत्महत्या करतो. येथे बाकीचे हळहळतात. 'शांतता.....' मध्ये, पुढे होणाऱ्या कार्यक्रमाची रंगीत तालीम म्हणून खटला सुरू होतो, पण

नेहमीपेक्षा तो निराळ्या रूपात आकार घेत जातो. बेणारेला सक्तीने त्यात विशिष्ट जागा पत्करावी लागते. आपली कोंडी झाल्याचे लक्षात येते तेव्हा तिची पहिली खिलाडूवृत्ती मरगळते, ती तर बधिर होत जाते. शिक्षेची अंमलबजावणी होण्यापूर्वीच शिक्षा भोगल्यासारखी मृतप्राय होऊन पडते. खेळाचे पर्यवसान असे भयंकर होते. येथे बाकीचे 'एवढं काय मनावर घ्यायचं' असे म्हणून पुढच्या खेळासाठी निघून जातात 'डेंजरस गेम' व 'शांतता....' यांतील हा भेद पुन्हा पुन्हा अधोरेखित करावा असाच आहे.

दोहोंतील संवादांतील साम्यभेदाबद्दल असेच म्हणणे अपरिहार्य आहे; कारण साम्य थोडे आहे, भेदच भरपूर आहे. साम्यदर्शक काही जोड्या ....

१) Host - Our game is possibly a little strange. (डेंजरस गेम, पृ. २०)

सुखात्मे – एक खेळ आहे हा बास! (शांतता..... पृ. ३१)

२) Traps - What a lot of fun! (पृ.४२)

बेणारे – मी तर अगदी लाइट आहे. (पृ. ३१)

३) Judge - Mercy would be incompatible. There can be nothing nobler than the condemnation of a man to death. (पृ. ९१, ९२)

कोर्ट – हे सर्व दयेपलीकडील आहे. तुला जिवंत ठेवून तुझा गर्भ मरेपर्यंत नष्ट करण्यात यावा अशी शिक्षा तुला देत आहे. (पृ. ९६)

अशा साम्यदर्शक जोड्या थोड्याच आढळतात; शिवाय त्यांतील अर्थाच्या छटा अगदी सारख्याच आहेत असेही म्हणता यावयाचे नाही. खरे सांगावयाचे तर 'शांतता...' मधील संवादांना व भाषेलाही 'डेंजरस गेम' च्या मानाने एक विलक्षण धार आहे - हिंस्र श्वापदांच्या सुळ्यांना, नखांना असते तशी! ड्युरेनमातच्या कादंबरीतील प्रश्नोत्तरांपेक्षा तेंडुलकरांच्या नाटकांतील सवाल–जबाबांत असलेल्या आशयगत वेगळेपणाइतकेच त्यांतील हे शैलीगत निराळेपणही पुन्हा पुन्हा रेखांकित करावे असेच आहे.

'डेंजरस गेम' पेक्षा 'शांतता.....' मध्ये अशी भिन्नता असल्यामुळेच दोहोंच्या तात्कालिक परिणामांतील समबलतेवर चकून चालावयाचे नाही. दोहोंचा परिणाम झपाटणारा, घुसमटून टाकणारा, सुन्न करणारा आहे, हे खरे. तथापि, परिणामांची कारणे सारखीच नाहीत, हेही लक्षात घ्यावयास हवे. 'डेंजरस गेम' चा अंतिम परिणाम, खेळाचे भयानक पर्यवसान होते, याच्या जाणिवेमुळे होतो; तर 'शांतता....' चा अंतिम परिणाम, निर्व्याज वाटणारी माणसे माणसांच्याच बाबतीत किती अक्राळविक्राळ होऊ शकतात, याच्या दर्शनामुळे होतो. सम परिणामांच्या विषम कारणांचे मूळ दोन लेखकांच्या उद्दिष्टात सापडते. ड्युरेनमातला, गुन्हा कुरूप असतो असे नाही, तसेच न्याय सुंदर असतोच असेही नाही, हे शेवटी लक्षात आणून द्यावयाचे असावे असे वाटते; तर तेंडुलकरांना, विसाव्या शतकातील सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या माणसांचे रानटी पशुत्व अंती निदर्शनास आणून द्यावयाचे असावे असे वाटते. उद्दिष्टेच भिन्न; तेव्हा ठेवण भिन्न होणारच!

आतापर्यंत केलेल्या तौलनिक चर्चेचा निष्कर्ष असा – 'प्लेझर ऑफ ऑनेस्टी' व 'श्रीमंत' यांत जितके साम्य आहे तितकेही 'डेंजरस गेम' व 'शांतता....' यांत नाही. सादृश्य असलेच तरी ते अल्प आहे, स्थूल आहे. आकारिक आहे; विसदृशताच पुष्कळ आहे, अणू–रेणूत आहे, आशयिक आहे. आणि म्हणूनच, ड्युरेनमातकडून तेंडुलकरांनी बरीच उचल घेतली असे कधीच म्हणता यावयाचे नाही. त्याचप्रमाणे 'डेंजरस गेम' पेक्षा 'शांतता.....' हे जास्त तीव्र असल्यामुळे, तुलनेत ते केव्हाही हिणकस ठरणार नाही.... एकमेकींच्या जवळून, पण वेगळ्या रुळांवरून, त्याही भिन्न दिशांनी जाणाऱ्या दोन साहित्यकृतींची फार ओढून ताणून तुलना करणे आणि एकीच्या मानाने दुसरीची गुणवत्ता ठरवणे, हे कितपत प्रयोजक मानता येईल? – मला तरी शंकाच वाटते.

अनुक्रमणिका

जे. बी. प्रीस्टले यांचे 'डेंजरस गेम'[२४] हे (टाइम प्लेज मधील एक) नाटक व तेंडुलकरांचे 'शांतता....' यांतील साम्याबद्दल कोणी वाद घातलेला दिसत नाही आणि कोणी हटातटाने वाद घातला नाही, हे ठीकच झाले. कारण, दोहोंत साम्य फारच थोडे व तेही खरोखरच अगदी जुजबी आहे. 'डेंजरस कॉर्नर' चा एक अंक जेथे – ज्या सिच्युएशनवर संपतो, तेथेच – त्याच सिच्युएशनवर दुसरा अंक सुरू होतो; 'शांतता ....' मध्येही असेच घडताना दिसते. दोहोंत मुख्य साम्य आहे ते इतकेच! आणि तेंडुलकरांनी आवश्यक तो ऋणनिर्देशही केला आहे. तेव्हा 'डेंजरस कॉर्नर' व 'शांतता...' यांबद्दल अधिक चर्चा करण्याची आवश्यकताच नाही.

'अशी पाखरे येती' या नाटकाबद्दल, 'श्रीमंत', 'शांतता...' या नाटकांसारखा जोरदार वादविवाद झालेला नाही. त्याच्या आशयाच्या संदर्भात केवळ शंका घेतली गेली आहे. ही शंका, एका आनुषंगिक टिपणातून पुन्हा प्रा. प्र. ना. परांजपे यांनीच घेतली. 'अशी पाखरे....' वर प्रा. रा. भा. पाटणकर यांनी मूळ टिपण लिहिले, त्यावर आक्षेप घेणारे टिपण रोहिणी सावंत यांनी लिहिले. या दोन्ही टिपणांचा परामर्श घेण्यासाठी प्रा. परांजपे यांनी एक टिपण लिहिले. या टिपणात जाता जाता त्यांनी शंका घेतली, ती अशी – "('अशी पाखरे....' चा) जो आशय आहे त्यात नाटककाराचा वाटा किती? (आणि) तेंडुलकरांनी उल्लेखिलेल्या 'रेन मेकर' चा किती?"[२५]

प्रा. परांजपे यांनी तेंडुलकरांच्या ज्या उल्लेखाचा निर्देश केला आहे तो उल्लेख असा – "प्रस्तुतच्या नाटकातील प्रमुख व्यक्तिरेखा व तिच्याभोवताली गुंफलेला अनुभव येथला, माझ्या जगाशी संबंधित. त्याला नाट्यरूपात प्राप्त झालेला तोंडवळा 'रेन मेकर' पेक्षा"[२६] निराळा असणे अपरिहार्य होते. तथापि, तो कटाक्षाने निराळा ठेवण्याचा अट्टाहास मात्र मी केला नाही."[२७] 'रेनमेकर' हे अमेरिकन नाटक – एन. रिचर्ड नॅश यांचे. प्रत्यक्षात या दोन नाटकांचा तोंडवळा कसा आहे? तेंडुलकरांच्या नाटकात नॅशच्या नाटकाचा वाटा खरोखर किती आहे? या प्रश्नांची वस्तुनिष्ठ उत्तरे द्यावयाची झाली तर दोन्ही नाटकांचे आंतरबाह्य रूप न्याहाळून पाहणे आवश्यक होय.

ज्या बीजातून ही नाटके फुलतात, ते बीज तसे एकच आहे. एका भटक्या तरुणाने ('रेनमेकर' मध्ये स्टारबक, 'अशी पाखरे....' मध्ये अरू) एका अस्फुट तारुण्यात असलेल्या मुलीच्या (अनुक्रमे लिझी व सरू) भावना फुलवून, तिला नवजीवनाचा लाभ करून देणे, ही दोन्ही नाटकांतील बीजभूत घटना. या घटनेला जे उन्मेष येतात, जो फुलोरा बहरतो, त्यांचे रंगरूप मात्र एकसारखे नाही, बहरण्याची क्रिया ज्या पार्श्वभूमीवर, ज्या परिस्थितीत घडून येते, त्यांतही सारखवट असे फारसे काही नाही.

बाह्यतः 'रेनमेकर' व 'अशी पाखरे.....' यातील पात्रव्यूह तसा बराच सारखा आहे – तरुण मुलगी (अनुकमे लिझी व सरू), भटक्या तरुण (स्टारबक व अरू), मुलीचे वडील (एच. सी. करी व अण्णा), मुलीचे भाऊ (नोहा, जिम व बंडा), संभाव्य वर (फाइल व विश्वास). थोडा, पण महत्त्वाचा भेदही आहे – 'रेनमेकर' मध्ये दोन भाऊ आहेत, 'अशी पाखरे ....' मध्ये एकच आहे. पहिल्यात मुलीची आई दाखवलेली नाही, दुसऱ्यात ती प्रमुख पात्र म्हणून आहे. 'रेनमेकर' मध्ये शेरीफ हे पात्र आहे, तसे 'अशी पाखरे....'त नाही. पहिल्यात लिझीच्या मुलाचे पात्र नाही, दुसऱ्यात सरूच्या मुलाचे पात्र आहे.

समान पात्रांच्या मनोरचनेतही साम्यभेदांचा असाच दुरंगी खेळ पहावयास मिळतो. लिझी व सरू यांना त्यांच्यामधील सुंदर स्त्रीत्वाची पुरेशी जाणीव अजून झालेली नाही हे साम्य; तर सरू दाखवण्याच्या कार्यक्रमाला कंटाळलेली आहे, लिझीच्या बाबतीत असे म्हणता येणार नाही, हा भेद. स्टारबक व अरू हे दोघेही भटके आहेत हे साम्य; तर अरू अधिक लाघवी आहे, व्रात्य आहे, सरूच्या घरात व मनात आतवर शिरूनही पुन्हा अलिप्त राहणारा आहे, स्टारबकच्या बाबतीत असे

म्हणता येणार नाही, हा भेद. बंडाचा संघिष्ट अवतार हे 'अशी पाखरे...' चे खास वेगळेपण. करी दुष्काळामुळे शेतमळ्याच्या चिंतेने ग्रासलेले आहेत, तर अण्णा आपल्या मुलीच्याच काळजीने कातावलेले आहेत. फाइल अपेशी विवाहित, तर विश्वास उमदा प्रथमवर. शिवाय त्याच्यातील उदात्त आसक्ती, सुकोमल सहृदयता मोठी लोभस आहे.

मुख्य घटना 'रेनमेकर' व 'अशी पाखरे....' यांत बऱ्याच सारख्या असल्या तरी पोषक प्रसंग व बारीक तपशील यांमधील भेद नगण्य नाही. भटक्या भावना फुलवतो, ही घटना दोहोंत आहे – 'रेनमेकर' मध्ये ती दुसऱ्या अंकात घडते, 'अशी पाखरे .....' मध्ये पहिल्याच अंकात घडून जाते. फुलवणारा व फुललेली यांना एकमेकांविषयी काही वाटले तरी त्यांचा विवाह होत नाही, हे दोहोंत सारखे. 'रेनमेकर' मध्ये शेवटी लिझी तयार होत नाही म्हणून, तर 'अशी पाखरे ...' मध्ये अरू पहिल्यापासूनच गुंतायला तयार होत नाही म्हणून, हे वेगळे. 'रेनमेकर' मधील चांदणभेट अवर्षणाच्या शुष्क पार्श्वभूमीवर घडते, तर 'अशी पाखरे ....' मधील भेट समृद्ध निसर्गाच्या रसिल्या पार्श्वभूमीवर घडून येते. पहिल्यात स्टारबकला पकडण्यासाठी शेरीफ येतो ही कायदेशीर घटना आहे, तर दुसऱ्यात अरू आपल्याला नकार देणाऱ्या मुलीसाठी शुभचिंतन करतो ही उदात्त घटना आहे. मुलगी 'पाहण्याच्या' कार्यक्रमाच्या निमित्ताने उद्‌भवणारे नरम-गरम प्रसंग ही 'अशी पाखरे....' ची खासियत!

'अशी पाखरे ....' मधील संवादांतील काही वाक्ये 'रेनमेकर' मधील वाक्यांसारखी असली तरी बहुतेक संवादांचा, भाषेचा ढंग अनोखा आहे. विशेषतः अरूच्या स्वच्छंद संलापाचा. सारख्या असलेल्या वाक्यांच्या काही जोड्या–

१) Starbuck : It (looking glass on the wall) is in the wrong place. It's gotta be inside you. (रेन. पृ. ८६)

अरू : जरा पहा तर स्वतःकडे, आरसा शोधून नव्हे, नुसत्या लाजून. (अशी पाखरे .... पृ. ३०)

२) Lizzie : Oh, is it me? It is really me! (पृ. ८८)

सरू : खरंच, तुम्ही भेटलात म्हणून मला मी कोण आहे, काय आहे ते कळलं! (पृ. ४८)

३) Starbuck : I m a liar and a con man and a fake. (पृ. १०२)

अरू : मी फार वाईट आहे, फार नीच आहे, अधःपतित आहे. (पृ. ७३)

अर्थात अशा जोड्या थोड्याच. शिवाय त्यांत बिंबप्रतिबिंबभावही कमीच! अरूचे खुमासदार बोलणे जी किमया दाखवते, जादू घडवून आणते, ती 'अशी पाखरे.....' मधील एक विलक्षण विलोभनीय बाब!

'रेनमेकर' व 'अशी पाखरे....' या दोहोंचा परिणाम, भावना फुलवणाऱ्या चांदणभेटीच्या प्रसंगापुरता, काहीसा सारखा होतो; परंतु संपूर्ण नाटकाचा परिणाम मात्र वेगळा वेगळाच होतो. निसर्गरम्य पार्श्वभूमीमुळे 'अशी पाखरे ....' हे अधिक गोजिरवाणे वाटते. पराडकर कुटुंबातील नाट्य तेंडुलकरांनी असे खुबीखुबीने टिपले आहे की 'अशी पाखरे....' हे अधिक कौटुंबिक व अधिक भावमधुर वाटते.

सर्व साम्यभेद लक्षात घेता, निष्कर्ष निघतो तो असा – 'अशी पाखरे येती' मध्ये 'रेनमेकर'चे काही पडसाद ऐकू आले तरी ते अक्षरशः साद्यन्त स्व-तंत्र आहे. नॅशच्या नाटकासारखा थोडासा तोंडवळा असला तरी तेंडुलकरांचे मुळापेक्षा जास्त साजरेगोजरे नाटक ही खास त्यांचीच निर्मिती आहे.

'घाशीराम कोतवाल' वर निसटत्या वारासारखा आरोप करण्यापलीकडे कोणी काही म्हटलेले नाही. १९७५ साली, मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष या नात्याने श्रीमती दुर्गा भागवत यांनी एक मुलाखत दिली होती. या मुलाखतीत त्या म्हणाल्या होतया – 'घाशीराम कोतवाल' नाटकाची रचना व्हिक्टर ह्यूगोच्या एका नाटकावर आधारलेली







आहे! मी लिहिणार आहे कधी तरी त्याबद्दल![२८] अगदी अलीकडे, 'घाशीराम कोतवाल' परदेशी गेले होते तेव्हा, दुर्गाबाईंनी आपल्या म्हणण्याचा पुनरुच्चार केला होता; परंतु त्यांनी यावर विस्तृत व तौलनिक असे काही लिहिल्याचे अजून तरी पाहण्यात नाही. सुरुवात केली होती, असे तेंडुलकरांच्या (५-३-७६ च्या, मला आलेल्या) एका पत्रावरून दिसते. पण मनोहरांनी 'महाराष्ट्र टाइम्स' मध्ये जे लिहिले ते मात्र आरोप करणारे नसून आरोपांचे खंडन करणारेच आहे.. ह्यूगोचा आधार आहे, असे सर्वात अगोदर आपण म्हटले होते, असे कै. अ. ज. करंदीकर माझ्याजवळ बोलले होते.

या बाबतीत तेंडुलकरांनी बरेच दिवस मौनच पाळले होते. नंतर एकदा सोलापूरला व मग पुण्याला, व्याख्यानांतून, त्यांनी (आरोपाचा उल्लेख न करता) उत्तरवजा खुलासा केला. हा खुलासा म्हणजे 'घाशीराम .....'च्या निर्मितीची कहाणी केव्हा तरी मोरोबा कान्होबांचे 'घाशीराम कोतवाल' वाचले होते. त्यानंतर मुंबईतील शिवसेनेची दंगल जवळून पाहिली, आणि निष्पाप माणसांतून राक्षस कसा जन्माला येतो, हे पाहावयास मिळाले. येथे राक्षसाच्या जागी वाचलेल्या पुस्तकातील घाशीराम दिसू लागला. पुढे एकदा मुंबईतच, पार्ल्याला, झोपडपट्टीसमोरील लोकनृत्यातून नाट्यबंध सापडला. आणि या सगळ्यातून अखेरीस 'घाशीराम ....' ची निर्मिती झाली.[२९] अशी ही संक्षिप्त कहाणी.

तेंडुलकरांनी सांगितलेल्या कहाणीतून त्यांना असे सुचवावयाचे असावे की ह्यूगोच्या नाटकाशी 'घाशीराम....' चा काहीही संबंध नाही. हे एकदम प्रमाण न मानता, ह्यूगोचे नाटक 'दी किंग्ज डायव्हर्शन' किंवा 'दी किंग ॲम्युजेस हिमसेल्फ'[३०] (हे मूळ नाटकाच्या भाषांतराचेच दुसरे नाव) व तेंडुलकरांचे नाटक 'घाशीराम कोतवाल'[३१] या दोन नाटकांची तुलना करू; म्हणजे आपोआपच वस्तुस्थितीवर प्रकाश पडेल.

सत्ताधारी व्यक्तीच्या ('किंग्ज डायव्हर्शन' मध्ये राजा फ्रान्सिस व 'घाशीराम कोतवाल' मध्ये नाना फडणीस) विषयलालसेला त्याच्या खुशमस्कऱ्याची (अनुक्रमे ट्रिबुलेट व घाशीराम) मुलगी (ब्लान्शं व ललिता गौरी) बळी पडणे आणि त्यामुळे खुशमस्कऱ्या प्रक्षुब्ध होणे, ही आधारभूत गोष्ट दोन्ही नाटकांत समान आहे. हे मान्य केले तरी, दोन्ही नाटकांत, गोष्टीची अंगोपांगे समान आहेत, असे म्हणता येईल का, हा खरा प्रश्न आहे.

आताच उल्लेखिलेल्या पात्रांवरून, दोन्ही नाटकांतील प्रमुख पात्रव्यूह पुष्कळ सारखा आहे, हे सहज लक्षात येण्याजोगे आहे. (ह्यूगोच्या नाटकातील सरदार व तेंडुलकरांच्या नाटकातील ब्राह्मण यांच्या समूहातील स्थूल साम्याचा उल्लेख जाता जाता करावयास हरकत नाही) पात्रव्यूहातील महत्त्वाचा भेद मात्र मुद्दाम सांगितला पाहिजे. फ्रेंच नाटकात ट्रिबुलेटच्या कटातील साथीदार म्हणून मॅगेलन व साल्टाबॅदिल ही पात्रे येतात, ती मराठी नाटकात नाहीत. (तसेच पात्रसमूह दोन्ही नाटकांत असला तरी दोहोंचे प्रयोजन कार्य, स्थान एकच नाही. ह्यूगोच्या नाटकापेक्षा तेंडुलकरांच्या नाटकात ते जास्त महत्त्वाचे आहे. याकडेही लक्ष द्यावयास हवे.) फ्रेंच नाटकात 'सूत्रधार' नाही, मराठी नाटकात तर तो अग्रभागी वावरतो.

सत्ताधीशाची कामुकता व (तिला आपली मुलगी बळी पडल्यामुळे झालेला) खुशमस्कऱ्याचा प्रक्षोभ, हे दोन्ही नाटकांतील साम्य; तर फ्रान्सिसपेक्षा नानात खोल मुत्सद्दीपणा जास्त आहे, ब्लान्शंसारखी अनुरक्ती ललितगौरीत लवमात्र नाही, घाशीराम प्रक्षुब्धतेपोटी आणखी उन्मत्त होतो, पण ट्रिबुलेटप्रमाणे सत्ताधीशाचा काटा काढण्याचा डाव टाकत नाही, हे महत्त्वाचे भेद. साम्याइतकेच हे भेदही लक्षात घेणे आवश्यक.

घटनांच्या दृष्टीने सांगावयाचे तर, सत्ताधीशाने तरुण मुलीचा अनुनय करणे, पाठलाग करणे, तिच्याशी लगट करणे आणि हे सारे कळल्यावर, खुशमस्कऱ्याने प्रक्षुब्ध होऊन थैमान घालणे, थयथयाट करणे, हे दोन्ही नाटकांत पुष्कळसे सारखे आहे; उलटपक्षी, सरदारांनी

राजासाठी मुलीला पळवून नेणे, त्याचा सूड म्हणून खुशमस्कऱ्याच्या साथीदारांनी राजाला मारण्याचा प्रयत्न करणे आणि चुकून राजाऐवजी ती मुलगीच मारली जाणे, यांतील काहीच 'घाशीराम ....' मध्ये नाही, आणि खुशमस्कऱ्याने खुबीने अधिकार मिळवणे, पुढे त्याचा गैरवापर करणे, त्याच्या जोरावर रयतेला हैराण करणे, यांतील काहीही 'किंग .....' मध्ये नाही. आणखी एक – 'घाशीराम ....' मध्ये मुख्य नाट्यामागे, पुण्यातील विशिष्ट वातावरणाचा जो जिवंत पडदा सतत हालतो-झुलतो, तसा प्रकार 'किंग....' मध्ये कोठेच नाही. क्वचित काही सरदार-दरकदार येतात-जातात, पॅरिसच्या रंगेलपणाविषयीचा एखादा उल्लेख येतो, एवढेच. तेव्हा, साम्य किती व भेद किती, हे जाणत्यांना वेगळे स्पष्ट करून सांगितलेच पाहिजे का?

दोन नाटकांत, सत्ताधीशाच्या कामुक बोलण्यापुरते किंवा खुशमस्कऱ्याच्या शोक-संतापापुरते, संवादांतील काही वाक्यांत साम्य आहे. उदाहरणार्थ –

१) King : Two happy lovers are themselves a World. (किंग्ज डायव्हर्शन, पृ. २०९)

नाना : अगो, अगो अशी लाजू नकोस. हा आमचाच वाडा. हे खाजगी दालन. (घाशीराम कोतवाल, पृ. २२)

२) King : Ah! what a hand is thine! So soft, so taper! (पृ. २४१)

नाना : नीट पाहिलीस? उभार, कोवळी .... (पृ. २४)

३) Triboulet : Now giddy world look on! Here see the jester! There the king... Beneath my feet I spurn him... (पृ. २५९-६०)

घाशीराम : कोतवाली हासिल केली. ब्राह्मण जमात कशी मऊसूत आणली. (पृ. ४१)

४) Triboulet : My Blanche, My happiness, My darling child! (पृ. २६७)

घाशीराम : गौरी, मेरी लाडली, क्या हुआ यह बेटी? (पृ. ४७)

अर्थात, डोळ्यात तेल घालून शोधल्या, तरी अशा जोड्या विरळ आहेत आणि आढळणाऱ्या जोड्यांतही अक्षरशः सारखेपणा नाही. फ्रेंच नाटकात अधूनमधून पद्य असले तरी त्याला ऑपेरा म्हणता येईल का, ही शंका आहे. उलट मराठी नाटकाचा, त्यातील संवादांचा, भाषेचा सारा बाजच लयबद्ध व संगीत-नृत्यानुकूल आहे, हा भेद अगदी व्यवच्छेदकच होय.

ह्यूगोचे नाटक व तेंडुलकरांचे नाटक या दोहोंचा परिणाम, विशिष्ट प्रसंगांपुरता जरी सारखा होत असला तरी त्यांचा संकलित परिणाम नक्कीच वेगळा होतो. ह्यूगोच्या नाटकातून मनोदर्शन-भावदर्शन घडते. तथापि ते नाटक वाचल्यावर, एखाद्या उत्कंठावर्धक गोष्टीचा होईल, तसाच परिणाम होतो. तेंडुलकरांचे नाटक एकदम ढोबळ-बटबटीत वाटले, तरी त्यातून दिसणाऱ्या विदारक जीवनचित्राचाच परिणाम अखेरीस होतो.

'किंग्ज डायव्हर्शन' व 'घाशीराम कोतवाल' या दोहोंतील सारखेपणा/वेगळेपणा लक्षात घेऊन एकच निष्कर्ष काढणे शक्य आहे, तो असा – काही बाबतींत ही नाटके समांतर जातात; तरीसुद्धा ह्यूगोच्या नाटकावरून तेंडुलकरांनी आपले नाटक घेतले – बेतले, असे म्हणणे हे जरा जादाच होईल. एखाद्याजवळच्या नोटेसारखीच नोट दुसऱ्याजवळ दिसल्याबरोबर, कोणी तरी कोणाची तरी नोट चोरली असली पाहिजे, असा तर्क करण्यासारखेच ते होय!

तेंडुलकरांच्या ज्या नाटकांवर चौर्याचा किंवा मूळ कृतीच्या विकृतीकरणाचा आरोप केला गेला आहे, अथवा निदान तशी शंका घेण्यात आली आहे, त्या नाटकांची मूळ नाटकांशी तुलना करून पाहिली. ही तुलना आकारिक (फॉर्मल) जास्त झाली, ती अधिक आशयिक (सब्स्टॅन्शिअल) हवी होती, असा आक्षेप येण्याचा संभव आहे. परंतु असे करणे हे किती अवघड

किंबहुना प्रायः अशक्यच आहे, हे संशयित नाटकांचे तौलनिक वाचन केले तर सहज ध्यानात येण्याजोगे आहे. उल्लेखित परकीय नाटकांपेक्षा तेंडुकरांची नाटके कशी वेगळी आहेत हे आणखी सिद्ध करावयाचे म्हणजे दोन्ही नाटकांतील पानांमागून पाने उद्धृत करावयाची. अर्थात हे अगदी अशक्य नसले तरी अनावश्यक आहे. तेव्हा संशयित नाटकांचे तौलनिक वाचन करून जी धारणा झाली तिच्या आधारे आतापर्यंत लिहिले आहे आणि निष्कर्ष काढले आहेत, तेवढे पुरेसे ठरावे. ज्या नाटकांच्या बाबतीत तोंडी संशय घेण्यात आले त्यांचा नामनिर्देश सुरुवातीला केला आहेच. कोणत्या मूळ नाटकावरून तेंडुलकरांनी आपले नाटक रचले हे लेखी, साधार – सप्रमाण सिद्ध करण्याची जबाबदारी आरोप करणाऱ्यांची वा संशय घेणाऱ्यांची नाही काय? ही जबाबदारी तेंडुलकरांच्या सर्व टीकाकारांनी पुरेशी सांभाळली आहे असे म्हणता येणार नाही. स्वतः तेंडुलकरांनी मात्र जबाबदारीची जाणीव ठेवून जबानी (?) दिली आहे.

तेंडुलकरांची भूमिका किती स्वच्छ आहे हे स्पष्ट व्हावे यासाठी, त्यांचे काही जबाब हेतुतःच पुढे देत आहे :– "मी येथल्या माझ्या भोवतालच्या आयुष्याविषयी लिहितो आहे. माझ्या स्वतःच्या एका जीवनदृष्टीतून ते मी रंगवतो. एवढं मान्य होणार असेल तर न केलेली उसनवारीही मान्य करण्याला माझी तयारी राहील."[३२] .... "माझ्या नाटकांना स्वदेशी, परदेशी असे सर्व आधार मी घेतो. आणि त्यांतून मला हवे तेच, मला हव्या त्या पद्धतीने म्हणतो. माझ्या दृष्टीने महत्त्व असते ते, मला हवे ते म्हणण्याला. स्वतंत्र या चिठ्ठीला नसते. पूर्णतया स्वतंत्र विषय व फॉर्म आज असू शकत नाही. एखादे नाटक भारतीय मातीतले आहे की नाही, ते त्याचे आधार शोधून नव्हे, तर त्यात जगणारी माणसे आणि त्यांचे जगणे नीट तपासूनच ठरविले पाहिजे."[३३] .... "माझी नाटकं, स्वतंत्र नाहीत असं कोणी म्हटलं तर ते मला लागत नाही. पण ती अनुवादित आहेत असं म्हटलं तर लागतं. (कारण, मला तो चित्रित माणसांचा अपमान वाटतो.)"[३४] या अवतरणांवरून स्पष्ट होते की तेंडुलकर शंभर टक्के स्वतंत्र निर्मितीचा दावा करीत नाहीत, स्वतंत्र दृष्टिकोणातून निर्मिती केली जावी, आपण करण्याचा प्रयत्न करतो, असे त्यांचे आवर्जून सांगणे आहे.

आता अखेरचा निकाल करावयाचाच काय तो बाकी आहे. तो पुढीलप्रमाणे करता येईल – तेंडुलकरांनी जेथे, तांत्रिक का होईना परकीय नाट्यकृतींचा आधार घेतला आहे, तेथे आवश्यक तो निर्देश केला आहे. (अपवाद थोडा 'श्रीमंत' चा, तेथे नाटकासोबत निर्देश नाही) आधार घेतलेला असला तरी तेंडुलकरांची नाट्यनिर्मिती ही उसनवारी ठरत नाही. उचलेगिरी, चोरी तर मुळीच नाही. हे कोणतीही चलबिचल न ठेवता ठामपणे सांगावेसे वाटते. असे वाटण्याचे कारण एकच की तेंडुलकरांची काही नाटके आधारित असली तरी ती स्व–तंत्र आहेत, पृथगात्म आहेत. मूळ नाटकांशी, काही बाबतींत, काही प्रमाणात, सादृश्य आहे, हे मान्य करावयास हवे. तथापि, मूळ नाटकांशी समरूपता नाही, एकरूपता तर नाहीच नाही, हे देखील निःसंदेहपणे मान्यच करावयास हवे. तेंडुलकरांची संबंधित नाटके म्हणजे अनुसर्जन नव्हे तर स्वायत्त सर्जनच होय.... नाक डोळे सारखे असले तरी व्यक्तिमत्त्व भिन्न असू शकते–असतेच की! तसेच तेंडुलकरांच्या नाटकांचे आहे. साम्य आहे असे म्हणावयाचे आणि तरीदेखील उचलेगिरी, चोरी नाही असेही म्हणावयाचे, हा कोणता प्रकार, असे कोणी विचारील. यावर उत्तर असे – मूळ नाटकांचा बराच प्रभाव तेंडुलकरांवर पडलेला असेल तर त्याचे संस्कार त्यांच्या स्वतंत्र निर्मितीवर होणे हे सहज शक्य आहे; असे संस्कार असले तरी तेंडुलकरांची निर्मिती स्वतंत्र मानावी लागावी इतकी ती सहजस्फूर्त व स्वयंसुसंगत आहे. क्वचित तोंडवळा दुसऱ्या कोणासारखा असूनसुद्धा आपली म्हणून एक छाप पडेल असे पृथगात्म रूप तेंडुलकर आपल्या नाटकांना देऊ शकतात. पूर्वग्रह न ठेवता प्रांजळपणाने कबूल करावयाचे, तर हेच तेंडुलकरांचे कौशल्य! केवळ कौशल्यच नव्हे

सामर्थ्यही! याहून आणखी काही उत्तर द्यावयाचे म्हणजे हुज्जतच घालावयाची! असे करणे हे केवळ अप्रशस्तच होय.

ताजा कलम :-

तेंडुलकरांचे निधन झाल्यावर त्यांच्याबद्दल लिहिल्या गेलेल्या दोन लेखांतील 'गिधाडे' या त्यांच्या नाटकाविषयीचे पुढील दोन उतारे आवर्जून लक्षात घेण्याजोगे आहेत—

१) "..... स्ट्रँड बुकस्टॉलमध्ये......शानभाग यांनी....... दोनतीन पुस्तकं मला दाखविली. त्यांत नूट हॅम्सन या लेखकाची 'दी जिंजरमॅन' ही कादंबरी होती..... मी ती विकत घेतली. लगेच वाचायला सुरूवात केली.....त्या कादंबरीतल्या पात्रांचं दारिद्र्य, भयानक स्वार्थ अन् त्यात जन्मलेली पशुवृत्ती हे सगळं अतिवास्तव.... महाभयानक होतं, त्यामुळे अनेकदा वाचायचा प्रयत्न करूनही ती कादंबरी माझ्या ऑफिसबॅगमध्ये पडून होती.

" एक दिवस अचानक प्लोरा फाउंटनला विजय तेंडुलकरांची गाठ पडली. ....त्यांना बघितल्यावर मला एकदम 'जिंजरमॅन'ची आठवण झाली. पटकन मी बॅगतून ते पुस्तक काढून त्यांना दिलं......

".....त्यानंतर बराच काळ आमची गाठ पडली नाही. त्यानंतर त्यांचं 'गिधाडे' हे नाटक अवतरलं. त्याचे परीक्षण वाचताना मला सारखी मी त्यांना भेट दिलेल्या 'जिंजरमॅन' कादंबरीची आठवण येत होती. त्यानंतर मी तेंडुलकर भेटले की त्यांना 'गिधाडे' लिहिताना त्यांच्यावर नूट हॅम्सनचा प्रभाव होता का, असं विचारायचं ठरवलं. पण.....तो प्रश्न विचारायचा राहूनच गेला...."

❒ 'माझ्या आठवणीतले विजय तेंडुलकर.....' — रमेश मुधोळकर (चित्रकार)— 'साहित्यसूची', पुणे, जुलै २००८, पृ.६७

२) ".....एकदा तनुजा, प्रिया आणि मला बाबांनी ट्रेनने पुण्याला, आजीकडे पाठवलं. .....आमच्याबरोबर 'गिधाडे'चं स्क्रिप्ट, कोणालातरी द्यायला दिलं होतं. प्रिया एवढी हुशार, तिनं ट्रेनमध्येच 'गिधाडे'चं स्क्रिप्ट वाचलं.... "...मला त्या नाटकाबद्दल सर्वच माहीत होतं. कारण खारला आम्ही 'गोडांबे व्हिला' मध्ये एका खोलीत राहत होतो. वरती त्या बंगल्याचे मालक गोडांबे राहत असत. बाबांनी ते नाटक त्यांच्यावरच लिहिलं होतं......मी त्यांच्याकडे जाऊन बसत असे. ते गोडांबे, त्यांची बहीण आणि अनेक लोक तिथे पार्टीला आलेले असत. दारू पिऊन ते त्यांच्या बहिणीबरोबर इंग्लिश म्युझिक लावून, डान्स करत असत. मला 'गिधाडे'चं वातावरण नवीन नव्हतं......."

❒ — सुषमा तेंडुलकर— 'ललित', मुंबई, ऑगस्ट २००८, पृ.२९

❒ आता या उताऱ्यांवरील माझी टिप्पणी —

१) श्री. मुधोळकर यांचा लेख वाचल्यावर, माझे मित्र डॉ. सु. रा. चुनेकर यांचे पुतणे (तेही नामांकित लेखक) श्री. जयवंत चुनेकर यांच्या मदतीने, मुंबईच्या 'एशियाटिक सोसायटी'च्या लायब्ररीतून, 'जिंजरमॅन'ची झेरॉक्स प्रत मिळवून, मी मुधोळकरांच्या म्हणण्याची खातरजमा करून घ्यायला सुरुवात केली.

'प्रथमग्रासे मक्षिकापातः' असा प्रकार झाला — 'जिंजरमॅन'चा लेखक हॅम्सन नसून डोनलेवी (अमेरिकन-आयरिश) असल्याचे दिसून आले. कादंबरी वाचताना, अर्ध्या एक पानाचा अपवाद वगळता, मुधोळकरांना संत्रस्त करून टाकणारे ते 'महाभयानक अतिवास्तव' कोठेही दिसेना!

मग मुधोळकरांना फोन केले, पत्रे पाठविली, काही प्रश्न विचारले; पण असे ध्यानात आले की त्यांची आठवण काही बाबतींत तरी फार अंधुक-धुसर-पुसट झाली आहे आणि अभावितपणे त्यांच्या लिहिण्या-म्हणण्यात बरीच गफलत झाली आहे; अर्थात, खातरजमा करून घेण्याचा आटापिटा निरर्थक ठरेल असे वाटून तो प्रयत्न मी थांबविला.

माझ्या पत्राला उत्तर म्हणून आलेल्या मुधोळकरांच्या २१.९.०८ च्या पत्रातील तीनचार ओळी फार महत्त्वाच्या आहेत; त्या अशा — "कै. विजय

तेंडुलकरांशी माझी ५० वर्षांची मैत्री होती. तेव्हा त्यांच्यावर 'प्लेजिऑरिझम'चा (म्हणजे वाङ्मयचौर्याचा) आरोप मी करणं शक्यच नाही. फक्त 'गिधाडे' लिहिताना त्या पुस्तकाचा त्यांच्यावर प्रभाव होता का, असं विचारावंसं मला वाटलं. पण ते राहून गेलं....."

यावर वेगळ्या टिप्पणीची गरजच नाही. असो.

२) सुषमाचा वडलांवरील लेख, 'गिधाडे'चे मूळ कोठे होते, हे निःसंदिग्धपणे व स्पष्टपणे दाखवून देणारा आहे.

एक-दोन पूरक गोष्टी सांगव्याशा वाटतात. तेंडुलकर पुण्यात जेथे राहत होते, तेथे दोहों बाजूंना, दारू पिऊन शिवीगाळ-मारहाण करणारी, पैशांसाठी बापाच्या पोटात (नुसते पेकाटात नव्हे) लाथा मारणारी माणसे, जिवंत भुतांप्रमाणे थैमान घालत होती; तीही 'गिधाडे'त घुसलेली असावीत! असो.

❒ प्रतिभावंतांची निर्मितिप्रक्रिया अनेक पदरी, गुंतागुंतीची, खोल असते. कशाशी तरी ढोबळ, वरवरचे साम्य पाहून, वाङ्मयचौर्याची अल्प-स्वल्प शंका घेणे हे केवळ आततायीपणाचे व उथळपणाचेच द्योतक होय.

❒ एवढी टिप्पणी पुरे! .... याप्रमाणे ताजा कलम संपूर्ण!! 'इति अलम्'!!!

**तळटीप :-**

'दी जिंजरमॅन' - जे. पी. डोनलेव्ही (जन्म - १९२६- न्यूयॉर्क; तेथे व ट्रिनिटी कॉलेज - डब्लिन - येथेही शिक्षण.) पुस्तक - प्रथम प्रकाशन-फ्रान्समध्ये-१९५५; कॉर्गीबुक्सकडून प्रकाशन-ग्रेट ब्रिटनमध्ये-१९६३; पेंग्विन बुक्सकडून प्रकाशन - इंग्लंडमध्ये - १९६८; पेंग्विनकडून पुनर्मुद्रण - १९७०.

'जिंजरमॅन'चं नाट्यरूपांतर स्वतः लेखकानंच केलं होतं.

फॉर्चुन थिएटर, लंडन, येथे प्रयोग - १९५९; ऑर्फीयम थिएटर, न्यूयॉर्क, येथे प्रयोग - १९६३. नाटक स्वतः लेखकाच्या (व्हॉट दे डिड इन डब्लिन या) प्रस्तावनेसह युनायटेड स्टेट्स् व इंग्लंड येथे एकाच वेळी प्रकाशित - १९६१. डोनलेव्हीच्या इतर कादंबरी-कथा-नाट्यलेखनाची माहिती प्रस्तुत कादंबरीच्या १९७० च्या आवृत्तीत-माझ्याजवळ असलेल्या प्रतीत उपलब्ध-प्रस्तुत कादंबरी सोडून या लेखकाची इतर एकूण पुस्तकं - ८.

**तळटीपा :-**

१) दीनानाथ लाटे, ('गृहस्थ ते गिधाडे', नाट्यभूमी, मुंबई, ऑगस्ट १९७०.)

२) माधव मनोहर, 'पाश्चात्त्य नाटककार आणि मराठी अनुवादक', सोबत, पुणे, १।६।१९६९, पृ. ७.

३) तत्रैव, पृ. ७

४) माधव मनोहर, 'विजय तेंडुलकर यांच्या स्पष्टीकरणाच्या निमित्ताने', सोबत, पुणे, २०।७।१९६९, पृ. २ व ३.

५) तत्रैव, पृ. १५.

६) तत्रैव पृ. १५.

७) विजय तेंडुलकर, '.... एक स्पष्टीकरण', सोबत, पुणे, १५।६।१९६९, पृ. १२.

८) लुइजी पिरांदेलो, 'दी प्लेझर ऑफ ऑनेस्टी', आर्थर लिव्हिंग्स्टन यांनी केलेला अनुवाद. ईच इन हिज ओन वेज अँड टू अदर प्लेज, लंडन, १९२६, यात समाविष्ट.

९) विजय तेंडुलकर, श्रीमंत, (आ. ३), पुणे, १९७०.

१०) माधव मनोहर, 'शांतता....', सोबत, पुणे, ७।१।६८, पृ. ७.

११) माधव मनोहर, उनि, क्र. २, पृ. ७.

१२) माधव मनोहर, उनि, क्र. ४ पृ. २, ३.

१३) प्र. ना. परांजपे, 'शांतता... च्या निमित्ताने,' मराठा, मुंबई २८।७।१९६८, पृ. ५.

१४) प्र. ना. परांजपे, 'तेंडुलकरांचे आणखी थोडे वस्त्रहरण', सोबत, पुणे, १०।८।६९, पृ. १०.

१५) तत्रैव, पृ. ११.

१६) प्रकाश गुप्ते, 'शांतता! तेंडुलकर चालू

अनुक्रमणिका

आहेत,' नाट्यभूमी, मुंबई, डिसेंबर १९६८, पृ. १९.

१७) विजय तेंडुलकर, 'शांतता! टीकाकार चालू आहेत', मराठा, मुंबई, ४।८।१९६८, पृ. १९.

१८) विजय तेंडुलकर, 'शांतता! तेंडुलकर चालू आहेत' च्या निमित्ताने, नाट्यभूमी मुंबई, जानेवारी १९६९, पृ. १७.

१९) विजय तेंडुलकर, उनि क्र. ७, पृ. १३.

२०) प्र. ना. परांजपे, उनि, क्र १४, पृ. १०.

२१) सत्यदेव दुबे, 'शांतता.... जळजळीत वास्तवाची क्लेशदायक जाणीव', मराठा, मुंबई, २९।१२।१९६८, पृ. ८.

२२) फ्रेडरिक ड्युरेनमात, ए डेंजरस गेम, रिचर्ड व क्लॉरा विन्स्टन यांनी केलेला अनुवाद, लंडन, १९६०.

२३) विजय तेंडुलकर, शांतता! कोर्ट चालू आहे, मुंबई, १९७१.

२४) जे. बी. प्रीस्टले 'डेंजरस कॉर्नर,' दी प्लेज ऑफ जे. बी. प्रीस्टले, खंड १, लंडन, १९४८, यात समाविष्ट.

२५) प्र. ना. परांजपे, 'अशी पाखरे येती', सत्यकथा, मुंबई, फेब्रुवारी १९७२, पृ. ७४.

२६) एन. आर. नॅश, दी रेनमेकर, न्यूयॉर्क, १९५७.

२७) विजय तेंडुलकर, 'अशी पाखरे येती', पुणे, १९७०, प्रास्ताविक.

२८) दुर्गा भागवत, मुलाखत, सुभाष भेंडे, सकाळ, पुणे, १४।९।१९७५, पृ. ३.

२९) विजय तेंडुलकर, 'हिंसाचार व माझे नाटक' या विषयावरील व्याख्यान, स. प. महाविद्यालय, पुणे ३।९।१९७६.

३०) व्हिक्टर ह्यूगो, 'दी किंग्ज डायव्हर्शन', एफ. एल. स्लाउस यांनी केलेला अनुवाद, ड्रॅमॅटिक वर्क्स् ऑफ व्हिक्टर ह्यूगो, लंडन, १८८७, यात समाविष्ट.

३१) विजय तेंडुलकर, घाशीराम कोतवाल, पुणे, १९७३.

३२) विजय तेंडुलकर, मुलाखत, रवींद्र पिंगे, निषाद, मुंबई, दिवाळी १९७२, पृ. १४.

३३) विजय तेंडुलकर, मुलाखत, ह. मो. मराठे, किर्लोस्कर, पुणे, फेब्रुवारी १९७३, पृ. ७५.

३४) विजय तेंडुलकर, मुलाखत, ललित, मुंबई, मे १९७६, पृ. १९.

ooo



अनुक्रमणिका

# कर्णाचा तेजोवध शल्याने केला होता का?

## प्रा० म० अ० मेहेंदळे

सर्वसाधारण समजूत अशी आहे की युद्धाच्या सतराव्या दिवशी कर्णाचे सारथ्य करताना शल्याने कर्णाचा तेजोवध केला. महाभारताविषयी कित्येक चुकीच्या कल्पना जनमानसात दृढमूल झाल्या आहेत त्यांतलीच ही एक. आता हेही खरे की त्या चुकीच्या कल्पना निर्माण होण्यास महाभारताची संहिताच जबाबदार आहे, आणि त्याचे कारण महाभारताच्या संहितेत अनेक प्रक्षेपांना स्थान आहे.

महाभारताच्या भीष्मपर्वाच्या एकेचाळिसाव्या अध्यायात एक अतिविचित्र घटना घडल्याचे वर्णन आहे. त्या घटनेच्या वैचित्र्यामुळे आणि इतरही कारणांमुळे तो संपूर्ण अध्याय प्रक्षिप्त असला पाहिजे असे माझे मत आहे. त्या सर्व तपशिलात सध्या जाण्याचे कारण नाही. प्रस्तुत विषयाशी संबंधित एका गोष्टीपुरते पाहिले म्हणजे पुरे. त्या घटनेत असे म्हटले आहे की भीष्म, द्रोण व कृप या तिघांची युद्धासाठी परवानगी घेतल्यावर युधिष्ठिर अखेरीस शल्याकडे गेला आणि युद्ध करण्यास त्याने त्याची परवानगी मागितली. शल्याने ती दिली आणि 'जयमाप्नुहि' असा आशीर्वाद दिला (६.४१.७५). आणखीही काही देण्याची तयारी शल्याने दर्शविली तेव्हा युधिष्ठिराने जो वर मागितला तो असा की पुढे युद्ध होईल तेव्हा कर्णाचे सारथ्य करताना शल्याने त्याचा तेजोवध करावा. शल्याने ते मान्य केले (सूतपुत्रस्य संग्रामे कार्यस्तेजोवधस्त्वया ६.४१.८१–८२).

युधिष्ठिराजवळ कबूल केल्याप्रमाणे कर्णाचा तेजोवध करायचे काम शल्याने चोखपणे पार पाडले हा समज निर्माण व्हावा असे श्लोक कर्णपर्वात आहेत. कर्णाचे सारथ्य करण्याचे काम स्वीकारल्यावर युद्धाच्या सतराव्या दिवशी ते दोघे जण रथात बसून रणांगणावर जायला निघाले तेव्हा त्यांच्यांत झालेल्या संभाषणात कर्णाचा तेजोवध व्हावा, लढायची त्याची हिंमत कमी व्हावी, यासाठी शल्याने त्याला बरेच काही ऐकवल्याचे महाभारतात वाचावयास मिळते. तेजोवध व्हावा म्हणून शल्याने कर्णाला काही दाखले दिले, हंस आणि काक यांची एक दीर्घकथा सांगितली, मागे दोन वेळा अर्जुनाने कर्णाचा पराभव केला होता याची त्याला आठवण करून दिली (८.२६.२७–२९, ६१–६९; ८.२७.१७–२५, ३०–५२; ८.२८.१–६६; ८.३०.८३–८७). तो सर्व तपशील येथे देण्याचे कारण नाही. एवढे सांगितले तरी पुरे की शल्याने एकदा कर्णाला स्पष्टपणे सांगून टाकले की हे युद्ध त्याच्या मरणासाठीच सुरू झाले आहे. आज जर तो भयामुळे रणांगण सोडून पळून गेला नाही तर त्याचे प्राण गेलेच असे त्याने समजावे (८.२६.६९). हे सारे ऐकल्यावर कर्णाचा तेजोवध झाला नाही तरच नवल! हे सारे श्लोक महाभारताच्या चिकित्सित आवृत्तीत समाविष्ट आहेत.

परंतु शल्याविषयी असा गैरसमज करून घेण्यापूर्वी कर्णाचा तेजोवध त्याने केला असल्याची अजिबात शक्यता नाही हे स्पष्टपणे दर्शविणाऱ्या अतिशय महत्त्वाच्या श्लोकांकडे वाचकांचे संपूर्ण दुर्लक्ष झाले आहे. त्या श्लोकांवरून असे स्पष्टपणे लक्षात येते की शल्याने कर्णाचा तेजोवध तर केला नाहीच, उलट कर्णाला अर्जुनाशी लढण्यास त्याने प्रोत्साहित केले, योग्यवेळी त्याला धीर दिला, आणि कठीणप्रसंगी सूचना देऊन सावध पण केले. या सर्व गोष्टी सारथी या नात्याने शल्य कर्णाचे हित जपत होता असे दर्शवितात. सारथी म्हणून आपले कर्तव्य शल्याने प्रामाणिकपणे पार पाडले. त्याने केलेल्या एका अतिशय महत्त्वाच्या सूचनेचा कर्णाने अव्हेर केला ही कर्णाची घोडचूक.

कोणत्या परिस्थितीत शल्य कर्णाचा सारथी

होण्यास तयार झाला हे पाहणे इष्ट आहे. युद्धाच्या सोळाव्या दिवशी कर्ण कौरवांचा सेनापती झाला. त्या दिवसाचे युद्ध संपले तेव्हा एक गोष्ट कर्णाच्या लक्षात आली की अर्जुनाशी यशस्वीपणे युद्ध करण्यास त्याच्याजवळ कृष्णासारखा कुशल सारथी नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने दुर्योधनाला सांगितले की त्याला कृष्णासारख्या कुशल सारथ्याची गरज आहे आणि ती गरज एकटा शल्यच पुरी करू शकतो. अस्त्र- प्रयोगात कर्ण स्वतःला अर्जुनापेक्षा सरस मानत असे. त्याचे 'विजय' धनुष्य अर्जुनाच्या 'गांडीवा'पेक्षा चांगले होते. अर्जुनासारखे त्याच्याजवळ अक्षय्य भाते आणि अच्छेद्य रथ नव्हता हे खरे. पण ती उणीव कर्णाच्या रथाच्या आसपास इतर अनेक रथ आणि बाणांनी भरलेले गाडे ठेवून भरून काढता येणे शक्य होते. कुशल सारथी नसल्याची उणीव फक्त शल्यच भरून काढू शकत होता. अर्जुनाच्या रथाचे रक्षण कृष्ण करतो तसे त्याच्या रथाचे रक्षण करणारा शल्यासारखा सारथी कर्णाला हवा होता, कर्णाचे सारथ्य करण्याचे शल्याने मान्य केले तर रणांगणावर कर्ण काय चमत्कार करू शकतो ते दुर्योधनाने पाहावे (८.२२.४४-५८). नंतर दुर्योधनाने कर्णाचा सारथी होण्यास शल्याला विनंती केली तेव्हा त्यानेही शल्याला सांगितले की सारथी या नात्याने शल्याने कर्णाचे रक्षण करावे (८.२३.५-६).

दुर्योधनाने शल्याला कर्णाचा सारथी होण्याची विनंती केली तेव्हा प्रथम शल्याला खूप राग आला. परंतु दुर्योधन जेव्हा त्याला म्हणाला की कृष्णापेक्षा तो अधिक योग्यतेचा सारथी आहे तेव्हा शल्य शांत झाला आणि त्याने सारथी होण्याचे मान्य केले (८.२३.४९-५१).

शल्याने अशा तऱ्हेने सारथ्याचे काम करण्यास संमती दिली तेव्हा त्याने कोणती जबाबदारी स्वीकारली होती याची शल्याला पुरती जाण होती. त्याने स्वतःच कर्णाला ते सांगितले होते. तो कर्णाला म्हणाला : युद्ध करणाऱ्या योद्ध्यांच्या बलाबलाची सारथ्याला चांगली माहिती असायला हवी. जिथे युद्ध होणार असेल तिथल्या समविषम भागांची माहिती त्याने ध्यानात ठेवली पाहिजे. रथी आणि रथाचे घोडे किती थकले आहेत हे सारथ्याने ओळखायला हवे. रथ हे सारथ्याचे कुटुंब असते हे जाणून या सर्व गोष्टी त्याला माहीत असायला हव्यात (सर्वमेतन् मया ज्ञेयं रथस्यास्य कुटुम्बिना ८.२८.५-८). कर्णाचे सारथ्य करायचे स्वीकारल्यावर शल्याने ठेवलेले हे भान आपण विसरता कामा नये. आपल्या 'कुटुम्बा'च्या प्रमुख व्यक्तीचा शल्य तेजोवध करील हे संभवत नाही. खेरीज शल्याने कर्णाला आश्वासन दिले होते की मातली जसा इंद्राचा सारथी तसा तुझा मी सारथी झालो आहे. तेव्हा कर्णाने सारी चिंता सोडावी (८.२५.१०-११).

कर्णाचा सारथी होण्यास शल्याने मान्यता दिली तेव्हा त्याने एक अट घातली होती. अट अशी की कर्णाच्या हिताच्या दृष्टीने तो कर्णास जे काही प्रियाप्रिय बोलेल ते सर्व दुर्योधनाने आणि त्याने सहन केले पाहिजे (यत्तु कर्णमहं ब्रूयां हितकामः प्रियाप्रियम्। मम तत् क्षमतां सर्वं भवान् कर्ण च सर्वशः।। ८.२५.६; ८.२३.४३). या अटीचा वाटेल तसा अर्थ करून प्रक्षेपकांनी कर्णाची निंदा करणारे आणि त्याचा तेजोवध होईल असे वर उल्लेखिलेले श्लोक शल्याच्या तोंडी घातले. भीष्मपर्वाच्या ४१ व्या अध्यायात कर्णाचा तेजोवध करण्याचे शल्याने जे आश्वासन युधिष्ठिराला दिले त्याप्रमाणे तो वागल्याचा आभास निर्माण करण्यात प्रक्षेपकाने अपरंपार यश मिळविले. आजतागायत महाभारताचे अभ्यासक आणि वाचक असेच मानीत आले की शल्याने खरोखर कर्णाचा तेजोवध केला.

प्रक्षेपकांनी निर्माण केलेला आभास हे एक निखालस सत्य असल्याचे मानणाऱ्यांनी पुढील गोष्टी ध्यानात घेतल्या नाहीत. (१) वर उल्लेखिलेली जी अट शल्याने घातली होती, आणि जिचा विपर्यास करून प्रक्षेपकांनी पदरचे श्लोक घुसडले, ती कर्णाचे हित साधण्यासाठी, त्याचा तेजोवध करण्यासाठी नव्हे (यत्तु कर्णमहं ब्रूयां हितकामः प्रियाप्रियम्); (२) सारथी होताना शल्याने कर्णाला विश्वास दिला की कर्णाने यापुढे कशाची काळजी करण्याचे कारण नाही (विज्वरो भव

सूतज ८.२५.११); (३) शल्याचे रक्षण कर्णाला मिळाल्यावर कर्ण निश्चित अर्जुनाचा पराभव करील अशी दुर्योधनाला खात्री होती (त्वयाभिगुप्तो राधेयो विजेष्यति धनंजयम् ८.२५.५); (४) शल्याने कर्णाच्या भल्यासाठी त्याला सावधगिरीची एक सूचना देऊन ठेवली होती. त्याने एकट्याने अर्जुनाशी युद्ध करू नये. स्वपक्षातील योद्ध्यांचे साह्य घेऊन लढावे (सहितः सर्वयोधैस्त्वं ... धनंजयेन युध्यस्व ८.२७.२६); (५) युद्धात कदाचित असे घडले की कर्णाची गाठ प्रथम भीमाशी पडली, कर्णाने भीमाचा वध किंवा पराभव केला, आणि मग त्याची अर्जुनाशी गाठ पडली तर कर्णाला ते हवे होते. त्याने ही शक्यता शल्याजवळ बोलून दाखवली तेव्हा शल्याने त्याला दुजोरा दिला, इतकेच नव्हे तर तसे घडल्यास कर्णाची अर्जुनाचा पराभव करण्याची फार काळची इच्छा सफल होईल याची खात्री दिली (यस्ते कामोऽभिलषितश्चिरात् प्रभृति हृद्गतः। सवै संपत्स्यते कर्ण सत्यमेतद् ब्रवीमि ते।। ८.३४.२१-२५).

हा सर्व तपशील शल्याने कर्णाचा तेजोवध केला असल्याचे दर्शवीत नाही. या संदर्भात एक लक्षात घेण्यासारखी बाब ही आहे की वर दिलेल्या तपशीलातले श्लोक, शल्य कर्णाचा तेजोवध करीत होता हे दर्शविणारे जे श्लोक आहेत त्यांतच ते घुसडले आहेत. या विसंगतीमुळे तेजोवध विषयक जे श्लोक शल्याच्या तोंडी आढळतात ते प्रक्षेप असल्याचे सिद्ध होते. प्रक्षेप केल्यामुळे विसंगती निर्माण झाली तरी तिकडे प्रक्षेपकांनी दुर्लक्ष केल्याची उदाहरणे इतरत्रही आहेत.[३]

कर्णाचा तेजोवध शल्याने केला नव्हता हे दर्शविण्यासाठी वर दिलेली माहिती एवढाच आधार आहे असे नाही. त्याहूनही बलवत्तर आधार उपलब्ध आहे.

(१) अर्जुनाचा रथ कर्णाकडे येत आहे असे पाहून शल्य कर्णाला म्हणाला : "गांडीव हातात घेऊन अर्जुन तुझ्यासमोर उभा आहे. त्याचा वध तू आज केलास तर त्यामुळे आपल्या सर्वांचे कल्याण होईल (तं हनिष्यसि चेदद्य तन्नः श्रेयो भविष्यति।). अर्जुनाशी युद्ध करू शकेल असा दुसरा कोणी धनुर्धर कौरवांकडे नाही. या वेळी अर्जुनाचे पाठीमागून किंवा दोन्ही बाजूंनी रक्षण करणारे कोणी योद्धे नाहीत. ही तुला नामी संधी आहे. जीभ चाटणाऱ्या एखाद्या सापाला, गर्जना करणाऱ्या वृषभाला, किंवा दडून बसलेल्या वाघाला जसे मारावे तसा तू अर्जुनाला मार (लेलिह्यमानं यथा सर्पं गर्जन्तमृषभं यथा। लयस्थितं यथा व्याघ्रं जहि कर्ण धनंजयम्।।). अर्जुनाच्या भयाने कौरवांची सेना पळत आहे. तिची भीती नाहीशी करील असा तुझ्याखेरीज दुसरा कोणी योद्धा नाही. पूर्वी ज्या धैर्याचा अवलंब करून तू वैदेह, अम्बष्ठ, काम्बोज, नग्नजित् आणि गांधार वीरांना जिंकलेस तेच धैर्य अंगी एकटवून तू आज कृष्णार्जुनांशी युद्ध कर (८.५७.१३-३२).

अर्जुनाशी अखेरचे युद्ध करण्याचा क्षण आला तेव्हा शल्याने कर्णाला दिलेले हे प्रोत्साहन, शल्य कर्णाचा तेजोवध करीत आहे असे दर्शविते का?

(२) दुःशासनाचा वध भीमाने ज्या क्रूरपणे केला (खरे तर त्याने तसा देखावा केला)[४] आणि त्याचे इतर दहा भाऊ मारले ते पाहून कर्ण पण मनात जरा चरकला होता असे दिसते. तसे तो स्पष्ट काही म्हणत नाही, परंतु दुसऱ्यांच्या चेहऱ्यावर दिसणारे फेरबदल आणि मनात चाललेली चलबिचल शल्य जाणणारा होता (आकारभावज्ञः) म्हणून त्यावेळी उचित शब्दांत (प्राप्तकालं) कर्णाला तो म्हणाला : "कर्णा, धार्तराष्ट्रांच्या वधाचा तू शोक करीत बसू नको. या घडीला ते योग्य नाही. दुःशासनाच्या वधामुळे दुर्योधन आधीच अत्यंत दुःखी झाला आहे. आपल्या पक्षातले भयभीत झालेले राजे आणि कृपप्रभति योद्धे दुर्योधनाभोवती गोळा झाले आहेत. अर्जुनाला पुढे करून पांडव तुझ्यावर चाल करून येत आहेत. अशा वेळी मोठे पौरुष अंगी आणून क्षात्रधर्माचे पालन करीत तू अर्जुनाला सामोरे जायचे आहेस (पौरुषे महति स्थितः। क्षत्रधर्मं पुरस्कृत्य प्रत्युद्याहि धनंजयम्।). युद्धाचा सारा भार दुर्योधनाने तुझ्यावर टाकला आहे. तुझी जबाबदारी तुला यथाशक्ती पेलायची आहे. या युद्धात तुझा जय

अनुक्रमणिका

झाला तर तुला प्रचंड कीर्ति लाभेल, पराजय झाला तर स्वर्ग प्राप्त होईल (जये स्याद् विपुला। कीर्तिर्ध्रुवः स्वर्गः पराजये। ८.६२.८-१६)." हे ऐकून कर्ण मनाने सावरला आणि युद्धास सज्ज झाला.

योग्य वेळी कर्णाला धीर देण्याची जी ही काळजी शल्याने घेतली ती अतिशय महत्त्वाची आहे. त्याचा सारथिधर्म त्याने प्रामाणिकपणे पाळला असल्याची ती निदर्शक आहे. त्याने शब्दही अतिशय काळजीपूर्वक उच्चारले आहेत. कर्णासमोर दोन पर्याय ठेवताना त्याने 'जय' किंवा 'पराजय' असे शब्द उच्चारले आहेत, 'जय' किंवा 'मृत्यू' असे शब्द उच्चारले नाहीत. युद्धारंभी अर्जुनाला गीतेचा उपदेश करताना कृष्णानेही असेच दोन पर्याय त्याला सांगितले होते. त्यावेळी तो "मृत्यु किंवा जय" असे म्हणाला होता (हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्। गीता २.३७). कृष्णाने पहिला उल्लेख मृत्यूचा केला, नंतर जयाचा. उलट शल्याने पहिला उल्लेख जयाचा केला, नंतर पराजयाचा, खेरीज शल्याने कृष्णासारखा थेट 'मृत्यू' शब्द वापरला नाही, त्याहून सौम्य 'पराजय' असे म्हटले. शल्याने घेतलेली ही काळजी अत्यंत योग्य होती. शल्याच्या या उपदेशात त्याला कर्णाविषयी वाटणारी आपुलकी व्यक्त होते, त्याचा तेजोवध करण्याचा मागमूस इथे नाही.

(३) कर्ण आणि अर्जुनाचे अखेरचे युद्ध सुरू होण्यापूर्वी कर्णाने हसून शल्याला विचारले : "सख्या शल्या, युद्धात अर्जुनाच्या हातून मला मरण आले तर तू काय करशील?" शल्याने ताबडतोब उत्तर दिले : "असे जर घडलेच, तर मी एकटाच रथात बसून (सारथी नसतानाही) कृष्णार्जुनांचा वध करीन (उभावेकरथेनाहं हन्यां माधवपाण्डवौ ८.६३.७४)." कर्णाचा तेजोवध करण्यास शल्य त्याचा सारथी झाला असता तर तो असे उत्तर देता ना. उलट कर्णाच्या मृत्यूने त्याला त्याचा कार्यभाग साधल्याचा आनंद झाला असता.

(४) शल्याने कर्णाचा तेजोवध तर केला नाहीच, उलट त्याचा जय व्हावा म्हणून सारथी ह्या नात्याने तो किती जागरुक होता हे दर्शविणारी एक महत्त्वाची घटना युद्धप्रसंगी घडली असल्याचे महाभारत सांगते. अर्जुनाचा वध करण्यासाठी एक अमोघ बाण कर्णाने जपून ठेवला होता. तसाच उपयोग असणारी एक इन्द्राकडून मिळालेली अमोघ शक्ती पण कर्णाकडे होती. ती त्याने तत्काळ वापरली नाही कारण त्या शक्तीने अर्जुनाचा वध करण्यात कर्णाचा पराक्रम नव्हता, तो त्या शक्तीचा प्रभाव ठरला असता. ती शक्ती अर्जुनावर सोडून कोणी सामान्य योद्धा देखील अर्जुनाचा वध करू शकला असता, त्यासाठी कर्णासारखा महारथी कशाला हवा? अखेर ती शक्ती घटोत्कचाला मारण्यात खर्ची पडली. तरी त्याच्याकडे एक अमोघ सर्पमुख बाण उरला होता. म्हणतात की त्या बाणावर तक्षकाचा पुत्र अश्वसेन अर्जुनावर सूड घेण्यासाठी टपून बसला होता. ते कसेही असो, तो बाण इंद्राने दिलेल्या शक्ती इतकाच प्रभावी होता हे नक्की. कर्णाने तो बाण धनुष्याला लावला आणि अर्जुनाचा शिरच्छेद करण्यासाठी त्याच्या कंठाचा नेम घेतला. एक कुशल सारथी या नात्याने शल्याने लागोलाग ओळखले की कर्णाचा नेम चुकावा म्हणून कृष्ण त्याचा रथ वाकवणार आणि कर्णाचा बाण वाया घालवणार म्हणून त्याने कर्णाला वेळीच सूचना केली की त्याचा बाण अर्जुनाचे शीर उडविणार नाही. त्याने अर्जुनाच्या कंठाचा घेतलेला नेम बदलून पुन्हा दुसरा नेम घ्यावा. शल्याची ही लाखमोलाची सूचना कर्णाने तत्काळ झिडकारली. तो शल्याला उर्मटपणे म्हणाला : "कर्ण कधी दोनदा नेम घेत नसतो. माझ्यासारखा योद्धा कपटनीतीचा अवलंब करीत नाही. (न संधत्ते द्विः शरं शल्य कर्णो न मादृशाः शाठ्ययुक्ता भवन्ति। ८.६६.८)." नंतर 'अर्जुना, मेलास पहा' असे मोठ्याने उद्‌गार काढून मानी कर्णाने तोच नेम धरून अर्जुनावर बाण सोडला. तो बाण अर्जुनाच्या कंठाच्या दिशेने येत असल्याचे पाहून, शल्याने कल्पना केल्याप्रमाणे, कृष्णाने अर्जुनाचा रथ पायांनी खाली चेपला आणि घोड्यांना गुडघ्यांवर बसायला लावले. परिणाम असा झाला की अर्जुनाचे डोके खाली झुकले. आणि कर्णाच्या बाणाने अर्जुनाचे डोके उडायच्या ऐवजी डोक्यावरचा किरीट


अनुक्रमणिका

उडाला. किरीट छिन्नविच्छिन्न झाला, पण अर्जुनाचे शीर सुरक्षित राहिले. अर्जुनाचा देदीप्यमान किरीट हे एक त्याचे मोठे भूषण होते खरे, पण तो गेल्याने त्याचे फारसे बिघडले नाही. एका क्षणात पांढऱ्या वस्त्राने (बहुधा अंगावरच्या उत्तरीय वस्त्राने) त्याने डोक्यावरचे केस नीट बांधले, आणि तो युद्धास सज्ज झाला. कर्णाचा अमोघ बाण वाया गेल्याने त्याची मात्र अपरिमित हानी झाली. शल्याने केलेल्या बहुमोल सूचनेप्रमाणे त्याने बाण तसाच न सोडता तो क्षणभर थांबला असता आणि पहिला नेम चुकविण्यासाठी कृष्ण काय युक्ती करतो ते पाहून मग दुसरा नेम घेऊन त्याने बाण सोडला असता तर तो अर्जुनाचा शिरच्छेद करण्यात यशस्वी झाला असता. कर्णाच्या गर्विष्ठ स्वभावामुळे त्याची अपरिमित हानी झाली, शल्याने त्याचा तेजोवध केला म्हणून झाली असे घडले नाही. कर्णाचा तेजोवध करण्यासाठी शल्य त्याचा सारथी झाला असता तर वरील प्रसंगी कर्णाला सावध करण्याचा प्रयत्न त्याने केला नसता, तो गप्प बसला असता.

वर दिलेल्या माहितीवरून हे स्पष्ट होते की शल्याने कर्णाचा तेजोवध केला असल्याचा प्रश्नच उद्भवत नाही. त्यामुळे शल्याने कर्णाचा तेजोवध करण्याचा प्रयत्न केला असे दर्शविणारे जे श्लोक महाभारताच्या उपलब्ध संहितेत आहेत ते सारे प्रक्षिप्त असल्याचे ठरते. हे श्लोक अध्याय २६ पासून अध्याय ३० पर्यंत विखुरले आहेत. त्यांत कर्णाचे आत्मश्लाघापर श्लोक आहेत. कर्ण आणि शल्य दोघांनीही एकमेकांच्या देशातील रहिवाशांची भरपूर निंदानालस्ती केली आहे. शल्याला जिवानिशी मारण्याची धमकीदेखील कर्णाने दोनदा दिली आहे (८.२७.१०३; ८.३०.८२). युद्धास सज्ज होऊन रथात बसलेला कौरवांचा सेनापती आणि स्वखुषीने त्याचा झालेला सारथी यांच्यात रणक्षेत्रावर एकमेकांना दुरुत्तरे करणारा संवाद घडणे कसे शक्य आहे? पण प्रक्षेप करणाऱ्यांना या अडचणी भेडसावीत नाहीत. प्रक्षेपामुळे कथेत विसंगती निर्माण झाली तर त्याचीही त्यांना पर्वा नसते.

अखेर कर्णाचा वध झाला तेव्हा त्याचा रिता रथ घेऊन शल्य दुर्योधनाकडे गेला आणि त्याने दुर्योधनाचे सांत्वन केले. तो म्हणाला : "आज कर्णार्जुनांत जे युद्ध झाले त्यासारखे युद्ध पूर्वी कधी झाले नाही. एकटा कर्ण कृष्णार्जुन आणि बाकीच्या साऱ्या शत्रूंना पुरून उरला (नैतादृशं भारत युद्धमासीद् यथाद्य कर्णार्जुनयोर्बभूव। ग्रस्तौ हि कर्णेन समेत्य कृष्णावन्ये च सर्वे तव शत्रवो ये।। ८.६८.९)." शल्याच्या सांगण्यात अतिशयोक्ती नव्हती. कर्णाच्या रथाचे चाक भूमीत अडकले तेव्हा देखील कर्णाने अर्जुनाला सळो की पळो केले होते (ततः कृष्णोऽर्जुनं दृष्ट्वा कर्णास्त्रेणाभिपीडितम् ८.६६.५७). शल्य पुढे म्हणाला : "कर्ण पडला तो त्याच्या पराक्रमातील वैगुण्यामुळे नव्हे. दैवच आम्हाला प्रतिकूल होते. ते पांडवांचे रक्षण करते आणि आमचा नाश करते. तेव्हा तू शोक करू नकोस. माणसाला नेहमीच यश मिळते असे नाही (दैवं .... पाण्डवान् पाति हिनस्ति चास्मान्। .... तन्मा शुचो भारत दिष्टमेतत् पर्यायसिद्धिर्न सदास्ति सिद्धिः।। ८.६८.१०,१२)."

कर्णाच्या रथावर बसून शल्य जर त्याचा तेजोवध करत असता तर कर्णाच्या निधनानंतर दुर्योधनाकडे मुद्दाम जाऊन कर्णाच्या पराक्रमाची त्याने प्रशंसा केली नसती. दुर्योधनाचे नुसते सांत्वन करण्याच्या भानगडीतही तो पडला नसता. कर्णाच्या पराभवाबद्दल तो दैवाला दोष देतो, कारण कर्णाच्या दुर्दैवानेच त्याच्या रथाचे चाक भूमीने गिळले आणि अर्जुनाशी तो पूर्वीच्या जोमाने लढू शकला नाही. कर्णाचे चाक खड्ड्यात अडकण्यात शल्याची चूक म्हणता येणार नाही. त्याने ते मुद्दाम खड्ड्यात अडकवले असेही म्हणता येणार नाही. वर म्हटल्याप्रमाणे रणभूमीवरील खाचखळग्यांची त्याला कृष्णाइतकी माहिती नव्हती. त्या एकाबाबतीत शल्य कृष्णापेक्षा उणा होता.

महाभारतातील कथेप्रमाणे शल्याने कर्णाचा तेजोवध केला नाही हे निश्चित. हा ठपका त्याच्यावर प्रक्षेपकांनी लादला आहे. महाभारतकथेप्रमाणे कर्णाचा

तेजोवध कोणी केला असेल तर तो भीष्माने. भीष्म कर्णाचा नेहमी द्वेष करीत असे. दुर्योधनाने भीष्माला सेनापती होण्याची विनंती केली तेव्हा त्याने ते पद स्वीकारण्यासाठी एक अट घातली. तो म्हणाला एकतर कर्ण आधी लढेल किंवा भीष्म. त्यावेळी कर्णाने लगेच सांगून टाकले की रणांगणावर भीष्म युद्ध करीत आहे, तोवर तो रणक्षेत्रावर पाय ठेवणार नाही. कर्णाने हे जाहीर केल्यावर भीष्माने सेनापतीपद स्वीकारले (५.१५३.२४-२६). भीष्माच्या या विलक्षण अटीमुळे युद्धाचे पहिले दहा दिवस कर्णाने युद्धात भाग घेतला नाही. त्यामुळे कौरवांची अपरिमित हानी झाली. एवढ्याने भागले नाही. युद्ध सुरू व्हायच्या आदल्या दिवशी (५.१६६.१३) कौरवांच्या पक्षात रथी (एकगुणी, द्विगुणी), अतिरथी, महारथी कोण कोण आहेत हे दुर्योधनाला सविस्तरपणे सांगताना (५.१६२.१७-१६५.८) भीष्माने अखेरीस कर्णाची फार मोठी अवहेलना केली. भीष्माच्या मते कर्ण अतिरथी, महारथी तर नव्हेच, पण साधा रथीही नव्हता. तो केवळ अर्धरथी होता.[६] तेव्हा संतापलेल्या कर्णाने भीष्माला सुनावले की कर्णाबद्दल वाटणाऱ्या द्वेषामुळे भीष्म त्याचा सतत उपमर्द करीत आला आहे. पण केवळ दुर्योधनासाठी त्याने तिकडे दुर्लक्ष केले. आता युद्ध समोर उभे राहिले असताना सैन्यात फूट पडावी म्हणून त्याचा असा तेजोवध भीष्माखेरीज दुसरा कोण करील? (को हि नाम ... तेजोवधमिमं कुर्याद् बिभेदयिषुराहवे ५.१६५.१३, १९). यावरून हे स्पष्ट होते की भीष्माच्या कटु बोलण्याने आपला तेजोवध झाला असे स्वतः कर्णास वाटले होते.

नंतर पांडवांकडे रथी, अतिरथी, महारथी कोण आहेत याचे विस्तृत वर्णन करताना (५.१६६.१४-१६८.२५) भीष्माने विराटपुत्र उत्तर, जो गोग्रहण प्रसंगी युद्धाला घाबरून रण सोडून पळून जाण्याच्या तयारीत होता, त्यालादेखील रथी असल्याचे ठरवले (५.१६७.१). पांडवांकडील फक्त क्षात्रधर्माला – धृष्टद्युम्नाच्या मुलाला कर्णासारखाच–अर्धरथी असल्याचे भीष्माने ठरवले. क्षात्रधर्म अर्धरथी असण्याचे कारण त्यांनी सांगितले ते असे की वयाने तो लहान असल्यामुळे त्याला शस्त्रास्त्रांचा फारसा सराव नव्हता (बाल्यत्वान्नातिकृतश्रमः ५.१६८.७). कर्ण वयाने लहान नव्हता आणि त्याला शस्त्रास्त्रांचा चांगलाच सराव होता. तरी त्याला अर्धरथी ठरवण्यात त्याचा तेजोभंग करण्याचा भीष्माचा उद्देश स्पष्ट होतो. भीष्माने कर्णाच्या पराक्रमाचे सर्वांसमक्ष फार मोठे अवमूल्यन केले.

तेव्हा कर्णाचा खरा तेजोवध भीष्माने केला. तो शल्याने केला असे मानण्यात परंपरेने फार मोठी चूक केली आणि शल्यावर अन्याय केला. तसे करताना एतद्विषयक वर उल्लेखिलेल्या सर्व महत्त्वाच्या श्लोकांकडे परंपरेने संपूर्ण दुर्लक्ष केले.

म्हटलेच तर कर्णाच्या तेजोभंगाचे आणखी दोन प्रयत्न झाले. पण ते दोन्ही प्रसंग निश्चितपणे प्रक्षिप्त वाटतात. मात्र त्या प्रक्षेपांचा हेतू कर्णाचा तेजोभंग व्हावा हाच होता. तो तेजोभंग कृष्ण आणि कुंती यांनी अप्रत्यक्षपणे केला. कौरवांच्या सभेत कृष्णाची शिष्टाई असफल झाल्यावर पांडवांकडे परतण्यापूर्वी कर्णाला एकट्याला रथात बसवून कृष्ण त्याला बाजूस नेतो. तिथे कर्णाला त्याच्या जन्माचे रहस्य कृष्ण सांगतो. कर्ण हा राधेय नसून कौंतेय आहे, सूत्रपुत्र नसून क्षत्रिय आहे हे सांगितल्यावर कृष्ण कर्णाला कौरवांचा पक्ष सोडून पांडवांकडे येण्यास सुचवितो. तसे झाले तर ज्येष्ठ पांडव म्हणून तो राज्यावर बसेल आणि द्रौपदीचा सहावा पतीही होईल हेही कृष्ण कर्णाला सांगून टाकतो (५.१३८.६-२८). कर्ण या प्रलोभनांना बळी पडत नाही. उलट कृष्णाने हे रहस्य पांडवांना सांगू नये म्हणून कर्ण त्याला बजावतो (मन्त्रस्य नियमं कुर्याः ५.१३९.२०; मंत्रसंवरणं कुर्वन् ५.१३९.५७).[७] नंतर तसाच प्रयत्न कुंतीने केला. तीही कर्णाला त्याच्या जन्माचे रहस्य सांगते आणि कर्णार्जुनांचे शत्रुत्व जगाला दिसण्याऐवजी त्यांचा सौभ्रात्र जगाच्या नजरेस पडू दे असे विनविते (५.१४३.२-१२). कुंतीचे बोलणे ऐकल्यावर कर्णाचा जन्मतःच त्याग तिने केल्याबद्दल प्रथम कर्ण तिची निर्भर्त्सना करतो आणि मग दुर्योधनाचा विश्वासघात करण्याचे साफ नाकारतो

(५.१४४.४-२२). कृष्ण व कुंती दोघांच्या प्रयत्नांच्या वर्णनात 'तेजोवध' शब्दाचा प्रयोग नाही हे खरे. तरी त्या प्रयत्नांना 'तेजोवध' अशासाठी म्हणायचे की त्यामुळे कर्णाला तो अर्जुनाचा मोठा भाऊ असल्याचे कळते. त्यामुळे पुढे अर्जुनाशी होणाऱ्या युद्धात कर्णाचा जोम कमी होणार आणि अर्जुन मात्र त्याला ते माहीत नसल्यामुळे पूर्ण जोमाने युद्ध करणार. पुढे युद्ध वर्णनात असे काही घडल्याचे म्हटले नाही. तसेच कर्ण एकटा कृष्णाच्या रथात बसून जाणे शक्य नाही आणि कर्णाची सूर्याराधना संपण्याचे वेळी कुंतीला कर्ण निवांतपणे एकटा (याचकांच्या घोळक्यात नसलेला) सापडणे शक्य नाही यामुळे हे दोन्ही प्रसंग निश्चितपणे प्रक्षिप्त ठरतात.

तळटीपा :-

१) सामान्यतः या घटनेचा उल्लेख होताना 'तेजोभंग' असा शब्द प्रचारात आहे. पण महाभारतात तो शब्द नाही, 'तेजोवध' असा शब्द आहे. 'तेजोवध'च्या विरुद्ध अर्थी 'तेजोवर्धन' असा शब्द महाभारतात एका निराळ्या संदर्भात आला आहे (५.१३४.१६). 'तेजोवध' हा शब्द महाभारताखेरीज प्रबंधकोश (२३.५) कल्हणाची 'राजतरंगिणी' (७.१२१३) आणि 'पृथ्वीराजविजय' (११.३६,९६) या काव्यांत आढळतो. तिन्ही ठिकाणी संदर्भ निराळे आहेत. तेजोभङ्ग शब्द महाभारतात नाही, तो निराळ्या संदर्भात 'पद्मपुराण' (२.३.३०), पदमञ्जरी (१.३.४७) येथे आढळतो. 'तेजोवधा'चे महाभारताखेरीज इतर तीन संदर्भ आणि 'तेजोभङ्गा'चे संस्कृत वाङ्मयातले दोन संदर्भ संस्कृत कोश विभागातून काढून दिल्याबद्दल मी सौ. मंदाकिनी किंजवडेकर यांचा आणि महाभारतातले 'तेजोवध' विषयीचे संदर्भ संगणकाच्या साहाय्याने काढून दिल्याबद्दल श्री. श्रीरंग बापट यांचा आभारी आहे.

२) रावणाचा सारथी पण रथ हे सारथ्याचे कुटुम्ब असते असे म्हणतो (रामायण ६.९३.१८-२०).

३) पाहा : V.S. Sukthankar, Prolegomena to the critical edition of the Adiparvan p. lxxxvii; F. Edgerton, Introduction to the critical edition of the Sathaparvan pp xxxi - xxxiii.

४) या विषयासंबंधी लेखकाचा हा लेख, 'दुःशासनाचे रक्त पिण्याची प्रतिज्ञा भीमाने केली होती का?' पाहावा. प्रसिद्धी : 'प्रसाद' मासिक, दिवाळी अंक २००५, पृष्ठे ८८-९०.

५) भीष्माच्या पाठोपाठ लगेच द्रोणाने त्याची री ओढली (५.१६५.५-८).

६) कठोर बोलून कर्णाचा तेजोवध केल्याची कबुली भीष्मानेच स्वमुखाने दिली आहे (६.११७.१०).

७) आणखी एका खुळचट प्रक्षेपात कृष्णाने पुन्हा एकदा असाच प्रयत्न केल्याचे वर्णन भीष्मपर्वाच्या ४१ व्या अध्यायात आढळते. हा साराच अध्याय प्रक्षेप असल्याचे वर म्हटलेच आहे. युधिष्ठिराने शल्याची युद्ध करण्याची परवानगी घेतल्यावर तो आणि इतर पांडव कौरवांच्या सैन्यातून बाहेर पडले. त्यानंतर कृष्ण एकटाच कर्णाकडे गेला आणि म्हणाला : "कर्णा, भीष्माच्या द्वेषामुळे (भीष्म जोवर लढत आहे तोवर) तू युद्ध करणार नाहीस असे आम्ही ऐकले आहे. तेव्हा तेवढे दिवस तू पांडवांच्याकडे ये आणि भीष्मपतनानंतर तुला योग्य वाटले तर तू पुन्हा कौरवांच्या साहाय्याला जा." कर्णाने अर्थात् कृष्णाची ही बावळट सूचना धुडकावून लावली (६.४१.८३-८७). कर्ण युद्ध करणार नसल्यामुळे तो त्यावेळी रणांगणांवर उपस्थित नसणार. तरीसुद्धा कृष्ण युद्धात (म्हणजे रणक्षेत्रावर) कर्णाकडे गेला असे म्हटले आहे (वासुदेवस्तु राधेयमाहवेऽभिजगाम वै ६.४१.८४). तेव्हा हे सारे वर्णन प्रक्षेप आहे यात संशय राहात नाही.

○○○

अनुक्रमणिका



# आधुनिक गीताचिंतनाची प्रस्तावना

श्री० राजीव साने

**कोण हा नवपार्थ ?**

गीता कोणालाही विन्मुख पाठवत नाही. कोणत्याही मताला अनुकूल असा आधार, गीतेत कोठे ना कोठे, सापडल्याशिवाय रहात नाही. गीता कोणालाही शांतवणारी, आश्वासन देणारी व प्रसन्नता देणारी आहे. आर्त, उद्विग्न, क्षुब्ध मनांना इतका हुकमी प्रथमोपचार पुरवण्याचे कार्य करण्याबाबत, गीतेच्या तोडीचे अन्य ग्रंथ क्वचितच आढळतील. गीतेच्या प्रचंड यशाचे रहस्य, तिच्यातील दर्शनशास्त्रीय सरमिसळ, बहुमुखी/बव्हर्थसूचक प्रतिपादन, विसंगती, विषयांतरे, या दोषांमध्ये दडलेले आहे. या दोषांमुळेच ती, एक सुसंगत विचारव्यूह या नात्याने सयुक्तिकतेच्या कसोटीवर टिकत नाही.

प्रश्न केवळ, 'एक सुसंगत विचारव्यूहच हवा' या आग्रहाचा नाही. प्रश्न आहे तो भारतीय मानसिकतेतील दुर्गुण कमी करण्याचा, सद्गुण वाढवण्याचा. गीता आणि भारतीय मानसिकता या दोहोंत परस्परांना पूरक ठरत जाण्याचे असे एक खास नातेही आहे. याचा अर्थ असा नव्हे की कोणाही भारतीयाने आपल्या कृत्याचे वैधीकरण पुढीलप्रमाणे करून घ्यावे. "माझे 'य' हे कृत्य वैध ठरते ते गीतेने घालून दिलेल्या नियमांपैकी 'क्ष' या नियमात बसते म्हणून !" किंबहुना व्यवहारात अमूक करा आणि तमूक करू नका असे आदेश देणे हे गीतेचे कार्यच नव्हे. समग्र जीवनदृष्टीसाठीची दार्शनिक चौकट पुरवणे, (मग ही चौकट धूसर, अस्फुट व अप्रत्यक्षही असू शकते) हे तिचे खरे कार्य होय. म्हणूनच ती "प्रथम दार्शनिक शिस्त अंगी बाणवा आणि मगच जीवनदृष्टी प्राप्त करून घ्या" असे कडक नियम वाचकांवरही घालत नाही आणि स्वत:वरही ! गीतेचा भारतीय मानसिकतेवरील प्रभाव हा 'घोड्याला लगाम घालावा' अशा थाटाचा नाहीच. उलट एखादा वायू विरळ होत होत वातावरणात पसरावा व तो श्वसनाद्वारे घेतल्याने घोड्यामधील 'उधळण्याची' वृत्ती कमी व्हावी असा आहे. (उधळणे कमी होते, पण जेव्हा जोराने पळायला हवे तेव्हाही जोराने पळता येत नाही, असाही आहे !).

मी जेव्हा गीता म्हणतो तेव्हा मला फक्त छापील प्रतींमधील संहिताच अभिप्रेत असते असे नव्हे. गीतेच्या (सार्थ) लक्षावधी छापील प्रती व तिच्यावरील डझनावरील टीका/भाष्ये यांच्याही भरपूर छापील प्रती काही 'वाचकां'पर्यंत व भरपूर पठक/पाठकांपर्यंत पोहोचल्या आहेतच. पण गीतेची भाषांतरे किंवा टीका/भाष्ये यांपैकी काहीही वाचलेले नसणाऱ्या भारतीयांच्या मनात देखील एक मुरलेली गीता नांदत असते. त्याच्या तोंडी "निमित्तमात्र", "निरपेक्ष वृत्तीने", "जन्मांचा फेरा", "कर्मदशा", "सोडव रे बाबा" असे शब्दप्रयोग सतत येत रहातात. "आत्मरंगी रंगले मन विश्वरंगी रंगले" असे अभंग तो गुणगुणत असतो. हिंदी सिनेमातही "कोरी चुनरिया आतमा (आत्मा) मोरी। मैल है मायाजाल। वो दुनिया मोरे बाबुल का घर। ये दुनिया ससुराल।" अशी गाणी गाजत असतात. पानांच्या टपरीवर किंवा चहाच्या हॉटेलात 'गीता सार' या नावे पत्रके चिकटवलेली असतात. त्यात "जो कुछ हो रहा है, वो अच्छेके लिये ही हो रहा है। तुम क्या लाये थे जो तुम्हे खोना पडेगा।" इत्यादी वाक्ये (ही गीतेच्या कोणत्या श्लोकांतून कशी निष्पन्न होतात हे मला तरी नेमके समजलेले नाही.) त्याच्यावर आदळत असतात. प्रचार हा मूळ संहितेपासून भरकटतो हे खरेच पण उपलब्ध संहितेतही तार्किक ताण व त्यामुळे 'तर्क सुटणे' हे भरपूर प्रमाणात आढळते. कसे ते आपण पुढे पाहू.

भारतीय मानसिकतेचा एक हृद्य सद्‌गुण असा की हे मन प्रतिकूल प्रसंगातून जाताना, कटुतेचे दुष्टचक्र सुरू न होऊ देता, प्रसन्न राहू शकते. पण त्याचवेळी, स्वतःच्या 'कर्तेपणा'ची जबाबदारी स्वतःवर न घेता कशा न कशावर तरी ढकलणे, हा अत्यंत घातक दुर्गुणही याच मानसिकतेत आहे. माणूस म्हणून असणाऱ्या मर्यादांत राहून योग्य कृत्य कोणते याचे सार्विक निकष शोधणे हे नीतिशास्त्राचे कार्य आहे. भारतात एतद्देशीय नीतिशास्त्र उभे राहू शकले नाही याचे कारण "योग्य अयोग्य कसे ठरवू" या प्रश्नाचे उत्तर "दोन्ही चिकटवून घेऊ नकोस" असे दिले गेले. (याचा गीतेशी थेट संबंध आहे.) तांत्रिक - आर्थिक - राजकीय रेट्याने आधुनिकता अंगीकारूनही, आधुनिक मूल्ये मात्र त्यामानाने आत्मसात् झालेली नसणे हा भारतीय समाजापुढचा यक्षप्रश्न आहे.

प्रपंच करावा नेटका हे कोणीच नाकारत नाही पण 'परमार्थ' हा मात्र प्रपंचाच्या बाहेर (व बाहेर पडण्यासाठी) राहतो. त्यामुळे स्वतःला मोठ्या प्रयोजनासाठी झोकून देणे/कसाला लावणे ही गोष्ट 'ह्या' जगाबाबतची उरत नाही. जगण्याला आध्यात्मिक बैठक हवी हे भारतीयांचे खास म्हणणे, आजच्या जगाला खरोखरच मोलाचे ठरणारे आहे. पण आध्यात्मिक बैठक ही फक्त निवृत्तिवादीच असू शकते हा अपसमज भारतीयांत खोलवर रुजला आहे. आध्यात्मिक क्षेत्रात झालेला निवृत्तिवादाचा (व त्याला पोषक असा 'मायावादाचा') विजय हाच भारताच्या ऐहिक अभ्युदयाचा पराजय ठरला आहे. कारण प्रवृत्तिपरता ही गोष्ट व्यावहारिक सत्तेत नाइलाजाने आवश्यक (आपद्धर्मच जणु), पण परमार्थतः मात्र, प्रवृत्तिपरता ही गोष्ट, केवळ उपरीच नव्हे तर निंद्यही राहिली आहे. जोपर्यंत 'परमार्थच पण तो प्रवृत्तिवादी' ही जुळणी गवसत नाही तोवर भारतीय मनातील हा खोलवरचा दुभंग भरून येणार नाही.

सुमारे शंभर वर्षांपूर्वी 'संन्यास नव्हे कर्मयोग' हा बदल घडविण्याचा एक प्रयत्न झाला (गीतारहस्य, लो. टिळक) परंतु त्यातही 'मोक्ष हाच खरा पुरुषार्थ व इतर पुरुषार्थ मोक्षासाठी आवश्यक तितपतच' ह्या धारणेला म्हणावा असा धक्का बसला नाही. याचे कारण असे की निवृत्तिवादामधील 'कर्तेपण टाळणे' या मुख्य गोष्टीसाठी 'कर्मयोग' हीच सर्वोत्तम युक्ती होती! आधुनिक भारतीयाला खरी गरज आहे ती 'कर्तृयोगाची' कर्मयोगाची नव्हे.

त्या दिशेने प्रवास झाला नाही कारण एकीकडे नास्तिकांनी, विज्ञानच आता अध्यात्माची जागा भूषवेल अशी धादांत चुकीची भूमिका घेतली, त्यामुळे त्यांच्यापुढे आध्यात्मिक चर्चाविश्वात उतरून नवी मांडणी करण्याचा प्रश्नच आला नाही. दुसरीकडे आस्तिकांनी मोक्षकेंद्री निवृत्तिवादच अधिक सोपा (बाह्यतः आधुनिक बनलेल्यांना युजर फ्रेंडली) करून सांगण्याचे व तो अडचणीत येताच, त्यावर मल्लिनाथी करून व गूढवादाचा आश्रय करून, पांघरूण घालण्याचे काम चालूच ठेवले. नास्तिकांच्या दृष्टीने जे एवीतेवी 'भंकस'च आहे त्याच्यातील सुसंगती/विसंगती कशाला शोधा? सगळेच गाठोडे 'रिटायर' करून टाका हाच कार्यक्रम राहिला. आस्तिकांनी "विसंगती नाहीतच. आपलीच ज्ञानशक्ती खुजी म्हणून आपल्याला त्या भासतात इतकेच" हेच उत्तर देणे चालू ठेवले. परिणामतः अध्यात्माची 'आतून चिकित्सा' हे प्रकरण दोघांनीही टाळले. यामुळे गीतेवरील सर्व भाष्ये शेवटी मोक्षकेंद्री-निवृत्तिवादीच राहिली. टिळकांचा कर्मावरील भर, ज्ञानदेवांचा चिद्‌विलासवाद्, अरविंदांचे बिकमिंग ऑफ कॉस्मिक स्पिरिट (विश्वचैतन्याचे विकसन) असे सूक्ष्म पातळीवरचे विद्रोह हे शांकरमताच्या मुख्य प्रवाहाला निर्णायक आव्हान देणारे ठरले नाहीत. खरे तर गीता संहितेतील विसंगती, दर्शन शास्त्रीय सरमिसळ, बव्हर्थसूचकता या गोष्टी; केवळ सयुक्तिकतेच्या कसोटीवर बाद ठरवून मोकळे होण्याच्या गोष्टी नव्हेत. गीता संहितेची हीच वैशिष्ट्ये आध्यात्मिक चर्चाविश्वात प्रवृत्तिवादाचे / कर्तृयोगाचे वळण देण्यासाठीचे गति-स्रोतही ठरू शकतात. पण यासाठी नवे परिप्रेक्ष्य हवे,

अनुक्रमणिका

गीतेविषयी व श्रीकृष्णाविषयी प्रेमादर हवा पण त्याचवेळी भारावलेपण, दिपलेपणा व शरणागती नको.

गीताप्रसंगीचा पार्थ या सर्व बाबतीत कमी पडला. विसंगती खटकल्यावर ती परखडपणे समोर आणणे, विषयांतरे व प्रश्नाला बगल देण्याचे प्रयत्न अडविणे आणि मुख्य म्हणजे मला नीतिजिज्ञासा आहे, मोक्षजिज्ञासा नव्हे, यावर ठाम राहणे, हे तो करू शकला नाही. श्रीकृष्णाचे म्हणणे, स्वतःच्या बुद्धीने आव्हानित करणे, हे त्याने क्वचित् क्षीण प्रयत्न म्हणून केलेले दिसते. जसे की,

मूळ (३.२)

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्।।**

अनुसाद (अनुवाद नव्हे, खुलासा येईल)

**संदिग्धशाच बोलांनी माझ्या बुद्धीस मोहवी**
**नेमके श्रेय ते काय निश्चिती ही मला हवी**

पण असे क्वचित् अपवाद वगळता तेव्हाच्या पार्थाचे प्रश्न हे त्याच्या तोंडी घातल्यासारखे वाटतात. ते यांत्रिकपणे, नवा शब्द आला की 'म्हणजे काय?' विचारणारे असे, म्हणजे खरेतर 'प्रश्न' नव्हेतच असे, येतात. नवख्या मुलाखतकाराला, जिची मुलाखत घ्यायची ती व्यक्तीच 'प्रश्न' लिहून देते, तसे काहीसे हे वाटते. तो पार्थ दिपलेला होता, भारावलेला होता व मुख्य म्हणजे महाभारतकालीन जाणिवांनी मर्यादित होता, म्हणूनही तो कमी पडला.

परंतु आता अशी कल्पना करा की त्या पार्थाला, अश्वत्थाम्याप्रमाणे जखम (पण ही मात्र अतृप्त श्रेय-जिज्ञासेची जखम) घेऊन चिरंजीवित्वाचा शाप मिळाला व तो आजही घुटमळत आहे. त्याने मनापासून आधुनिकता आत्मसात केलेली आहे पण तो आस्तिक आहे. (सेश्वर दार्शनिक या अर्थाने, वेदप्रामाण्यवादी किंवा मायावादी या अर्थाने नव्हे, तसेच 'शरणता' वादीही नव्हे). आधुनिक मूल्यांच्या प्रकाशात तो त्याचे महाभारतकालीन संदर्भविश्व (युद्धापूर्वीचे, युद्धातले, गीताप्रसंगीचे, युद्धोत्तरही) नव्याने पहात आहे.

तेव्हाच्या पार्थाने गीतेचे श्रवण केले होते. त्याचे श्रवण हे वक्त्याने (श्रीकृष्णाने) नियंत्रित केलेले होते. भाषणाचा ओघ जसजशी वळणे घेत गेला तसतसा तेव्हाचा पार्थ त्या त्या मुद्याने भारावत गेला. आजच्या काळात या चिरंजीव पार्थाला, गीतासंहिता, लिखित (छापील) स्वरूपात उपलब्ध असल्याने, त्याला 'वाचक' होण्याची संधी मिळाली आहे. वाचकाला वाचनात स्वातंत्र्य जास्त लाभते. विशिष्ट आस्थाविषय संहितेत विविध ठिकाणी विखुरलेला असला तरी, ते ते भाग एकत्र करून त्या आस्थाविषयावर संहिता काय काय म्हणते हे तो मागे पुढे जाऊन पाहू शकतो. संहितेतील आंतरिक विसंगती जरी मूळ क्रम सोडून घडलेली असली तरी ती त्याच्या ध्यानात येऊ शकते. श्रवणात वक्त्याचा प्रभाव फारच पडतो. (त्यात वक्ता हा साक्षात् ईश्वर आणि श्रोता हा दुविधेत सापडून गोंधळलेला माणूस असे असले की बघायलाच नको!) एखाद्या लिखितामधले 'मुद्याचे काय?' याचा लक्ष्यबिंदू वाचक ठरवू शकतो. 'वाचना'तले हे व असे इतर अनेक फायदे, तसेच ताबडतोबीच्या धर्मसंकटाने येणारी आर्तता नसणे यामुळे आपला हा पार्थ शांतपणे विसंगती, विषयांतरे, संदिग्धता इत्यादींना सामोरा जाऊ शकतो. निःसंकोचपणे व सखोलपणे चिकित्सा करू शकतो.

तर असा हा नवपार्थ! (ही काल्पनिक व्यक्तिरेखा आहे. जरी ती प्रस्तुत लेखकाची निर्मिती असली तरी तिला तिची म्हणून स्वायत्तता प्राप्त झालेली आहे.) खरे तर तेव्हाही बोलता आले असते पण, जे तेव्हा तो भिडेपोटी व कच्चेपणामुळे बोलू शकला नाही, ते तर त्याला बोलायचे आहेच पण आधुनिक दृष्टी लाभल्याने आता जाणवणारे असे नवेही काही बोलायचे आहे. त्याचा दृष्टिकोण चिकित्सक पण विधायक आहे. त्याला श्रीकृष्णाला दोषात पकडायचे नसून, प्रश्नांना सामोरे जाऊन स्वतःच्या बुद्धीने त्यातून मार्ग काढायचा आहे. म्हणून तो पर्याय सुचवतच टीका करतो आहे.

अनुक्रमणिका

मोक्षप्राप्ती/साक्षात्कार झालेल्या अत्यंत अपवादात्मक व्यक्तींबाबत नव्हे, तर बद्ध असणाऱ्या (सामान्य) मनुष्याने बद्ध असतानाचे 'स्वातंत्र्य' कसे पेलायचे यात त्याला स्वारस्य आहे. तो त्याच्या परीने कर्तृयोगशास्त्र उभे करीत आहे. मूळ गीता समजावून सांगणे हे त्याचे कार्य नव्हे. (हे कार्य बऱ्याच थोर लेखकांनी त्यांच्या त्यांच्या दृष्टीने उत्तमरित्या पार पाडलेले असल्याने त्याची गरजही नाही.) 'कर्तृधन्यतेद्वारा आत्मावस्था' या सिद्धांताच्या आधारे ती इहवादी नीतिशास्त्र आणि प्रवृत्तिवादी अध्यात्म यांच्यात पूल बांधत आहे.

भारतीय मानसिकतेतील पेच त्याला सोडवायचा आहे. योग, भक्ती इत्यादी उपासना मार्गांचे त्याला वावडे नाही. पण उपासना संप्रदाय म्हणून 'हिंदू' म्हणवल्या जाणाऱ्यांनाही, विजिगीषु, कर्तव्यनिष्ठ-कर्तृत्ववान, समर्थ, सौंदर्यप्रेमी व रसरशीतपणे जीवनवादी रहाता येते, हे त्याला दाखवून द्यायचे आहे. मोक्षेतर पुरुषार्थांची अवहेलना थांबवण्याने 'मोक्ष' सदृश पुरुषार्थालाही कसा वाव मिळतो हे त्याला सिद्ध करायचे आहे.

पण हे सर्व तो जनतेला उद्देशून नव्हे तर ईश्वरालाच उद्देशून बोलतो. गीतेच्याच आधारे तो आपले गाऱ्हाणेही मांडतो व पर्यायही सुचवतो. ईश्वराचे स्वरूप प्रवृत्तिवादालाच कसे अनुकूल आहे किंबहुना प्रवृत्तिवादी साधना हीच कशी खरी ईश्वरसाधना आहे हे तो सांगतो.

अध्यात्माचे चर्चाविश्व ज्या भाषिक वळणाचे असते, त्याच भाषिक वळणाने तो जातो. गीता ही गाण्याची गोष्ट आहे. नवपार्थहृद्गतही त्यामुळे सपद्य आहे. नाट्यछटा या वाङ्मयप्रकारात एकच पात्र स्वगत बोलते पण इतरही पात्रे त्याच्याद्वारे बोलतात हे लक्षात घेता, नवपार्थहृद्गत ही प्रदीर्घ-सपद्य-वाद-नाट्यछटा ठरते. ती स्वतंत्र ललित साहित्यकृती आहे. अधिकृत सांप्रदायिक 'विधान' कदापिही नाही.

म्हणूनच नवपार्थ मूळ गीताश्लोकांशी समदिशेने जे अर्थांकन करतो त्याला तो अनुवाद न म्हणता अनुसाद म्हणतो. मतभेद व्यक्त करतानाही प्रतिवाद नाही तर प्रतिसाद म्हणतो. अमुक लोकसंबंधित असे नाही पण स्वतंत्रपणे जे मत मांडायचे त्याला तो स्वयंसाद म्हणतो. येथे संहितेचा सांकेतिक उलगडा महत्त्वाचा नसून, नवपार्थाचे भावार्थ क्षितिज आणि गीतासंहितेचे त्याला उमगलेले भावार्थ क्षितिज यांच्या संयोगातून होणारा हा एका नव्या भावार्थ क्षितिजाचा जन्म महत्त्वाचा आहे.

अशा या नवपार्थाचे हृद्गत जर वाचकांच्या विचारांना चालना देणारे ठरायचे असेल तर वाचकांकडूनही काही अपेक्षा आहेत. वाचकांची गीतेशी (व महाभारताशीही) चांगली ओळख झालेली असणे आवश्यक आहे. वाचकाला भारतीय संस्कृती विषयी प्रेम (खरे प्रेम हे, आपल्या प्रेम विषयावर त्याने कसेही करून अभिमानास्पदच ठरले पाहिजे, अशी पूर्वअट घालत नसते.) असले पाहिजे. ऐहिक अभ्युदयात आपण कमी पडलो याची कबुली व आता कमी पडणार नाही याचा निर्धार असला पाहिजे. त्याने आपण शिरोधार्य मानलेल्या धारणा तपासून पहाताना असुरक्षित वाटून घेऊन चालणार नाही. त्या धारणा वादकाळात जरी आव्हानित राहिल्या तरी या ना त्या मार्गाने समृद्ध होऊन पुनर्स्थापित होणार असतात, अथवा नव्या लाभणार असतात. वाचकांनी नवपार्थाशी सहमत होण्याची अजिबात आवश्यकता नाही. नवपार्थाला समजून घेण्याद्वारे आपल्याला काय शिकायला मिळाले हे महत्त्वाचे. ते शिकून आपली भूमिका काहीशी नवपार्थाच्या बाजूची बनेल अथवा विरुद्ध जाईल वा तिसऱ्याच दिशेलाही वळेल!

नास्तिकांनी आपले बहुतांश सहयात्री आस्तिक आहेत याचे भान ठेवले पाहिजे. स्वयंमात्र ईश्वर असो/नसो वा अज्ञेय राहो, सहयात्रींच्या भावविश्वातला ईश्वर आहेच आहे. सहयात्रींशी संवाद साधायचा तर 'त्यांच्या' ईश्वराला न समजून घेऊन कसे चालेल?

आस्तिकांची ईश्वरावर इतकी दृढश्रद्धा हवी की नवपार्थाच्या चुकांमुळे ईश्वर बाधित होणार तर

नाहीच उलट तो नवपार्थाच्या 'आराधने'चे 'उचित फळ' नवपार्थाच्या पदरात टाकेल. ईश्वराचे 'रक्षण' करण्याची आपल्याला ना गरज आहे ना क्षमता. (खुद्द ईश्वराला तर अशा रक्षकांची गरज असूच शकत नाही.)

नवपार्थाची आराधना ही तत्त्वचिंतनात्मक स्वरूपाची आहे. त्याला प्रतिफल ही 'अंतर्दृष्टी' या स्वरूपाचेच मिळेल. भगवंतानीच म्हटले आहे.

मूळ ४.११

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्।**
**मम वर्त्मानुवर्ततन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः।।**

अनुसाद

**मला भजति जे जैसे तसा मी भजतो तया**
**सन्मार्गी लागण्यासाठी रीती हो भिन्न लब्ध त्यां**

जुन्या वळणाची भारदस्त मराठी गंभीर विषयांसाठी तरी चालती रहायला हवी. त्यासाठी थोडे कष्टही घ्यायची आपली तयारी हवी. अन्यथा मराठीचा ऱ्हास, सांस्कृतिक सपाटीकरण वगैरे कुरकुर करण्याचा आपल्याला काही अधिकार उरत नाही.

आपल्या संस्कृतीविषयी कोणत्याही स्वरूपात आपण हीनगंड बाळगता कामा नये व तिच्या सुरक्षिततेबाबत भयगंडही. आपली संस्कृती ही वेढा पडलेल्या किल्ल्याप्रमाणे नसून एखाद्या महानदीच्या जिवंत, खळाळत्या, उपनद्यांना सामावून घेत जाणाऱ्या, वर्धिष्णू प्रवाहाप्रमाणे आहे. उमदेपणाने आत्मपरीक्षण करता येणे हे आत्मविश्वासाचे विशेष लक्षण आहे.

❖❖❖

**प्रास्तविक विभाग : तीन**

**प्रश्न! जे उपस्थित करायचे राहूनच गेलेत!!**

आजमितीला गीतासंहितेचे 'वाचन' करताना नवपार्थाला अनेक गोष्टी खटकतात, बुचकळ्यात पाडतात व अस्वस्थही करतात. काही ठिकाणी तर "इतकी सरळ सरळ विसंगती असून ती आपल्या ध्यानातही येऊ नये?" याचा त्याला पश्चात्ताप होतो. आपण किती भारावलो होतो, दिपून गेलो होतो व ओघात वहावत गेलो होतो हे त्याच्या लक्षात येते. जे प्रश्न उपस्थित करणे मूळ पार्थाकडून व इतरांकडूनही राहूनच गेले ते तो आता उपस्थित करत जातो. त्यातूनही तो विधायक मार्ग कसे काढतो हे आपण 'हृद्गता'त पाहूच. पण त्याला सतावणाऱ्या प्रश्नांपैकी काही नमुनेदार प्रश्नांची आपण थोडी ओळख करून घेऊया. यामुळे 'हृद्गत' वाचण्यास उपयुक्त असे काही धागेदोरे आपल्या हाती लागतील व नवपार्थ गीतासंहितेत काय बघतो/शोधतो याचे काहीसे सूचनही आपल्याला मिळेल.

१) गीतेची सुरुवात (मूळ) पार्थाच्या विषादाने होते. नवपार्थदेखील विषाद व्यक्त करूनच आपल्या हृद्गताची सुरुवात करतो. पण त्याच्या विषादाचा आशय आता आरपार बदलून गेला आहे. तो महासंहार आपण टाळू शकलो असतो. जर आपण युधिष्ठिराशी वेळीच शुभद्रोह (जसा बिभीषणाने, विकर्णाने, विदुराने आपापल्या वडील बंधूशी केला) केला असता तर प्रकरण इतके चिघळत गेलेच नसते असे आता त्याला वाटते. आता त्याला युधिष्ठिर पुण्यात्मा वाटतच नाही. स्वघात आणि स्वजनघात याचे व्यसन जडलेला एक मानभावी माणूस वाटतो. आज त्याला भीष्मप्रतिज्ञा ही गोष्ट उदात्त वाटतच नाही. हस्तिनापूरचा युवराज म्हणून बेजबाबदारपणे वागणाऱ्या देवव्रताची, कामांध पित्याचा उमाळा येऊन केलेली लहरी कृती वाटते. प्रतिज्ञेत नसलेली कलमेही स्वतःवर ओढवून घेत, स्वतः निस्वार्थी व समर्थ असणाऱ्या भीष्मांनी दुर्जनांचे गुलाम बनून का रहावे? असा प्रश्न त्याला पडतो.

एकूणच त्या काळातील पात्रांनी सोयीनुसार निर्णय घ्यायचे व मागाहून पूर्वजन्मीची दिव्यकथा चिकटवून त्या निर्णयाला धर्म्यता प्राप्त करून द्यायची या प्रकाराला आळा घालणारा कोणीच धर्मवेत्ता उभा राहू नये? पुण्याई, शहाणपण व काहींच्या बाबतीत तर कथित 'घोर तपस्या' नसूनही, कोणालाही अचाट वर-शाप

देण्याच्या शक्ती प्राप्त व्हाव्यात? कोणीही ऋषीने उठावे व प्रसंगोपात्त विधिविधान करावे आणि अशा विधानांतली सुसंगती तपासणारी समाईक व्यवस्थाच नसावी? केवळ अगोदर घडले ते रूढी म्हणून मान्य करणे म्हणजे धर्म्यता? धर्म्यतेचे कोणालाही पटतील असे सामान्य निकषच नसावेत? (केवळ कोणाची आज्ञा पाळायची याचे निकष असले तरी काय स्वरूपाची आज्ञा याचे निकष नसावेत?) अशा स्थितीत धर्मग्लानी होणार नाही तर काय होणार? अनिर्णय व उलट सुलट निर्णय यांनीच प्रकरण चिघळवत नेऊन महासंहाराची वेळ आणली नाही काय?

२) गीता संहितेतही दिसते की, मूळ पार्थाचा प्रश्न नीतिजिज्ञासेचा होता. तरीही त्याला पूर्ण बगल देऊन भगवंतांनी, धर्मपुरुषार्थाऐवजी मोक्षपुरुषार्थाचाच उपदेश का केला? (जिवंतपणी) मोक्षप्राप्त असणाऱ्या व्यक्ती अत्यंत अपवादात्मकच असू शकतात असे भगवंतांचेच स्पष्ट मत होते तर सामाजिक नीतिमत्ता (जी 'बद्धा'लाच निभवायची असते) राखण्यास मोक्षोपदेशाचा उपयोग काय? ज्या घातक प्रेरणा मोक्षसाधकाने स्वतःतून निरसून टाकायच्या असतात, नेमक्या त्याच प्रेरणा तत्कालीन पार्थाला युद्धप्रवृत्त करण्यासाठी भगवंतांनी का वापराव्यात? का लढावे याचे युक्तिवाद व मोक्ष कसा मिळवावा याचे युक्तिवाद जर एकमेकांच्या विरोधात जात होते, तर मग त्यातले ग्राह्य काय मानायचे? अगदी उपदेश संपत आल्यावरसुद्धा युद्धप्रेरके ही क्षुद्र स्वार्थाधिष्ठित कशी येतात? नवपार्थ हे सारे प्रश्न सोदाहरण उपस्थित करतो.

३) पुनर्जन्म आणि कर्मविपाक हे अगदी शंभर टक्के खरे मानले तरी त्यातून 'न्याय' कसा होणार? जर सुभाग्य हे पारितोषिक व दुर्भाग्य हा दंड असेल तर ते दोन्ही कोणत्या कृत्यांबद्दल हे स्मरायला नको? 'च्या बद्दल' शिवाय 'पारितोषिक' वा 'दंड' हा अर्थ कसा लाभणार? खलपारिपत्य (अन्यायाबद्दल) केले गेले हे अन्यायग्रस्ताला समजायला नको? श्रेष्ठाने अर्हता कशी कमवली हे सामान्याला कळायला नको? न्याय्यतेच्या जाणिवेसाठी स्मृती पुसलेला पूर्वजन्म काय कामाचा? आपले काय चुकतेय व काय बरोबर आहे याचे शिक्षणही मूळ कृत्याच्या स्मरणाशिवाय कसे होणार?

जर वर्णव्यवस्था व्यक्तीच्या गुणमूल्यांकनावर आधारित (एके काळी) होती तर खुद्द ईश्वराला संकराची चिंता का पडावी? ईश्वराला संकराची चिंता असणे हा, वर्ण हे वंशवादी असल्याचाच पुरावा नाही काय? एखाद्याचे 'पुण्य', त्याला क्षत्रियांत टाकण्याला पुरेसे असेल पण रणकौशल्य शौर्य आदि गुण त्याच्यात नसले तर त्याला कुठे टाकणार? मृत्युसमयावरून पुढील 'गती' ही जर उत्तरायण/दक्षिणायन, शुक्ल पक्ष/ कृष्ण पक्ष, दिवस/रात्र अशा यादृच्छिक गोष्टींवर ठरणार असेल तर त्यात कोणता न्याय रहातो? ज्यांना शिळे, दुर्गंधी, नासके, उष्टे अन्न खावे लागते त्यांच्यावर 'तामसी' असा शिक्का मारून त्यांना दंडनीय ठरवायचे हा कुठला न्याय? शिक्षा ही सुधरविण्यासाठी की अधिक बिघडविण्यासाठी? जर आसुरींना अधिकाधिक आसुरीवृत्तीच मिळेल असे जन्म देत गेले तर त्यात शिक्षा कोणाला होते? त्यांना की त्यांच्या वर्तनाने इतर निरपराधांना? अडाणी व कर्मठ लोकांपासून ज्ञान गुप्त ठेवावे? त्यासाठी ज्ञान्याने आपले बाह्यवर्तनही अडाणी व कर्मठच राखावे? लोकांकडून कामे करवून घ्यावीत व समाजव्यवस्था टिकवावी, हे का ज्ञानी माणसाचे सामाजिक उत्तरादायित्व? या खेरीज नवपार्थ स्त्रीची उपेक्षा वगैरे अनेक उदाहरणे घेतो. 'माझा मोक्ष! बस्स!!' बाकी व्यवस्था कशीही असो, नाहीतर ती 'मायिक असत्‌च', ही वृत्ती न्याय्यतेचा आधार कशी बनणार?

४) कर्मातील फलहेतुकता त्यागण्याचा जो उपदेश येतो त्यात साधकाने कर्मरत तर राहिलेच पाहिजे असे भगवंत वारंवार सांगतात. कर्मरत रहाणे अपरिहार्य कसे हे सांगताना त्याची समर्थने नेमकी फलहेतुकता सांगणारीच कशी? भगवंत ईश्वरप्राप्ती, मोक्ष, आत्यंतिक असे आत्मसुख या गोष्टींनाही स्पष्टपणे 'फल' व 'लाभ'च म्हणत रहातात. खुद्द ईश्वराची कर्मेही जरी








अतृप्तिप्रेरित नसली तरी फलहेतुक (परित्राणाय साधुनाम् इ.) नसतात काय? ऊर्मी व शक्ती यांचे प्रयोग जर माणसाला कालांतरानेच (इतर प्राण्यांसारखे एकाच वेळी नव्हे) करावे लागतात व सांघिकतेने एकमेकांसाठी करावे लागतात, तर कर्म आणि फल हे द्वय तो कसे टाळू शकणार? कर्म कसे करायचे याचे उत्तर तरी फल कल्पनेखेरीज मिळेल काय? जर फलहेतुकता ही गोष्ट कर्माच्यांच नाण्याची दुसरी बाजू आहे तर ती कशी त्यागणार? असे असूनही नेमक्या कशाला 'सम्यक् फलत्याग' मानणे शक्य आहे?

५) मोक्षासाठी अहंलोप आवश्यक आहे. पण मर्त्य असतो तो अहंकारच, शोकविषयही अहंकारच, संकल्पकर्ता-वचनदाता, उत्तरदायित्व घेणारा हा अहंकारच. आता 'आत्म्या' चे अविनाशी, अविकारी, अकर्ते स्वरूप हे या अहंकाराला कसे उपयोगी पडणार? नवपार्थाला असे दिसते की अहंकारच स्वतःला आत्म्याच्या सवलती मागू लागतो. स्वतःला आत्मा समजून सुखावतो, दृढ होतो आणि 'अकर्तेपण' मिळवण्याच्या नावाखाली नाकर्ता मात्र बनतो. हा भयंकर धोका टाळून अहंलोप कसा करायचा? ज्याने कर्तृत्वात श्रेयपूर्णता व धन्यता कमावली नाही अशा अहंकाराला लोपण्याचा अधिकार तरी असतो का व लोपणे शक्य तरी असते का? मग कर्ता राहून काय करायचे असा उपदेश न देताच अकर्तेपणाचा उपदेश का यावा? कधी लोपायचे याचे निकष काय?

६) समदृष्टीने पहाणे हाही गीतेचा एक लाडका उपदेश आहे. नवपार्थाला प्रश्न पडतो की एकवेळ भोगात (शीतोष्ण, सुख-दुःख, मानापमान इ.) समदृष्टीने पहाणे योग्य असेलही पण समदृष्टी सुकर्म-दुष्कर्म, सुजन-दुर्जन, सद्गुण-दुर्गुण यांनाही सम पहा म्हणू लागते! हे कसे? विवेक म्हणजे भेद ओळखणे व समदृष्टी म्हणजे भेद दिसूनही तो न मानणे. स्वतः भगवंत शास्त्राशास्त्र, दैवी-आसुरी, सत्त्व-रज/तम, असे अनेक विवेकही सांगतात. जिथे विवेकच हवा तिथे समदृष्टी लावून कसे चालेल? कशाप्रसंगी विवेक आणि कशाप्रसंगी समदृष्टी याचे निकष भगवंत का सांगत नाहीत?

७) 'काम' हा नरकद्वार क्र. १ आहे असेही गीतेत येते व त्याच्यावर दमनानेच विजय मिळवला पाहिजे असा आदेशही येतो. दमनास्पद ठरवलेली इच्छा व तसे ठरवणारी इच्छा, यांच्यात रस्सीखेच चालते. अहंकार दमन करणाऱ्या इच्छेशी तादात्म्य पावून दमन करतो. 'कामरिपू' बलिष्ठ आहे मग त्यावर दमनाने विजय मिळवणारा अहंकार अधिकच बलिष्ठ नको काय? म्हणजे कामदमनासाठी तोच अहंकार बलिष्ठ करायचा की ज्याचा लोप करत न्यायचा आहे? अनित्य सुख हे स्वतः दुःखजनक असते की ते नित्य टिकावे हा आग्रह दुःखजनक असतो? सुख थांबू देता येणे शिकायचे की सुखावर बंदी घालायला शिकायचे? संयम-निग्रह या संदर्भात भगवंत नेहमी 'विषय' हा आकर्षक पण कुपथ्यकर आहे असेच का गृहीत धरतात? कर्तव्य पण घृण्य विषय आहेत व निग्रहाने इंद्रिये त्यावर रोखून धरायची आहेत असे प्रसंग नसतात काय? भगवंतच म्हणतात की जीव हा इतका प्रकृतिनियत आहे की निग्रहाने काय होणार? म्हणजे नैसर्गिक ऊर्मींना सम्यक् वाव देण्याचा प्रश्न आहे की सर्वच इच्छांचे दमन करण्याचा प्रश्न आहे? की कोणत्या इच्छांना कधी वाव द्यायचा याचे निकष ठरवण्याचा प्रश्न आहे? नवपार्थ पुनःपुन्हा सांगतो की सम्यक्तेचे निकष न पुरवता आत्यंतिक निरासच सांगितला जातो.

८) गीतेत स्थितप्रज्ञ, सिद्धयोगी, ज्ञानीभक्त इत्यादी 'पोहोचलेल्यां'ची वर्णनेच साधकाला उपदेश या स्वरूपात पुरवली जातात. 'ज्ञानोत्तर' जीवन कसे असेल याचे वर्णन हे ज्ञानपूर्व अवस्था कशी जगायची याचे उत्तर असू शकते का? 'पारंगत' वर्णने ही पारंगताला अनावश्यक व साधकाला दिशाभूल करणारी ठरणार नाहीत काय? एखादा माणूस दौर्बल्याने संकल्प टाळतो आहे. त्याला जर "सिद्ध हा संकल्परहितच असतो" हे निमित्त मिळाले तर तो आणखीच टाळाटाळ करणारा होणार नाही काय? जे दुःखमय जीवन कंठत आहेत,

तेजोहीन आहेत, त्यांना निरिच्छ बनवून चालेल का? (स्वतःच स्वतःचा उद्धार कर असाही संदेश गीता देते.) कोणता उपदेश कोणत्या टप्प्यासाठी आहे हे नेमकेपणाने न सांगता सरसकट पोहोचलेल्याची वर्णने पुरवणे योग्य आहे का?

९) 'राजसी' गुणसमुच्चय हा झटणारा, ईप्सित ठेवणारा, पूर्ती अपेक्षिणारा व एकूण सक्रिय आहे. नवपार्थाला आढळते की सात्त्विक = दैवी या समीकरणाच्या भरात गीता आख्ख्या 'राजसी' लाच आसुरी गणून मोकळी होते. अशाने 'कर्ता पण तो नैतिक' ही कोटीच रद्दबातल होत नाही काय? कर्ता हा नेहमी अनैतिकच असू शकतो असे मानल्यावर कर्त्यासाठीचे नीतिशास्त्र कसे सांगणार? तामसी जर मठ्ठ व निष्क्रिय आहे तर तो त्याच वेळी धूर्त व विध्वंसक कसा? एकूणच गुणत्रयाला संपत्तिद्वयात कोंबून बसवता येईल का? जर माणसाला श्रेयसाधना शक्य व्हायची तर 'दैविगामी मानुषी' (किंवा सत्त्वगामी राजस) ही कोटी उपलब्ध नको?

१०) नवपार्थाला असेही आढळून येते की गीतेत ईश्वराने स्वस्वरूप विवरण करताना (व जीवात्म्याचेही विवरण करताना) प्रचंड प्रमाणात सकृतदर्शनी विसंगती निर्माण केल्या आहेत? तू जग चालवतोस की प्रकृती स्वतःच चालते? यावर "मी/तिची तीच". (अशा उत्तरांची अवतरण चिन्हे, तोचतोचपणा नको म्हणून, या परिच्छेदात दिलेली नाहीत.) तू प्रकृती निर्मितोस की ही स्वतःच अनादी आहे? यावर मी निर्मितो/अनादी आहे. अशी परस्पर विरोधी उत्तरे प्रचंड प्रमाणात आढळतात. जीव माझ्या आत आहेत/नाहीत, मी जीवांच्या आत आहे/नाही. मी पाप-पुण्यात फेरफार करू शकतो/शकत नाही, मी ज्ञेय आहे/अज्ञेय आहे, मी सर्वेंद्रिय आहे/अनिंद्रिय आहे, मी सर्वांच्या पार आहे/सर्व मीच आहे, मी दुर्गुणही निर्मितो/सद्‌गुणच निर्मितो, मी सत् आहे/ असत् आहे/ दोन्ही नाही/ दोन्ही आहे/दोन्हीच्या पार आहे, आत्म्याला सूक्ष्मदेह चिकटतो/चिकटत नाही, माझ्यापर्यंत तुझे प्रत्यय पोहोचतात/पोहोचत नाहीत, मी चिन्मयच आहे/जडही मीच आहे. जीव प्रकृतीच्या अधीन आहेत/स्वतंत्र आहेत, मी सर्व जीवांत समान आहे/कमी अधिक प्रमाणात आहे. मी जगन्नियंता कर्ता आहे/मी पूर्णतृप्त अकर्ता आहे, आत्मा फक्त साक्षी आहे/भोक्ताही आहे; ही आणि अशी बरीच उदाहरणे आहेत.

नवपार्थ प्रश्न उपस्थित करताना या सकृतदर्शनी विसंगती दाखवून देतो. पण तो तेवढे करून थांबत नाही. सर्व अस्तित्व हे फक्त ईश्वराचेच आहे (सर्वेश्वरवाद) पण ईश्वर स्वतःला पाच भिन्न स्वरूपात अविष्कृत करतो. तो कोणते विधान कोणत्या स्वरूपातून करतो हे ओळखता आले की या विसंगती सुटतात हेही नवपार्थ दाखवून देतो. सर्व स्वरूपांची समतोल आराधना म्हणजेच सर्व पुरुषार्थांतील मेळ व तोल हे हा दाखवून देतो. कसे हृद्‌गतातच पाहू.

❖❖❖

**प्रास्ताविक विभाग : चार**

'आधुनिकतावादी' या संज्ञेत प्रस्तुत लेखकास काय अभिप्रेत आहे?

खरे तर नवपार्थाने आत्मसात केलेला आधुनिकतावाद, ही गोष्ट, ज्या भावनांनी तो गीतासंहितेला अनुसाद/प्रतिसाद देतो, त्या भावनांच्या अभिव्यक्तीतून वाचकांना जाणवल्याखेरीज राहणार नाही. किंबहुना हृद्‌गत वाचनाच्या अनुभवातून आधुनिकतावादही उमगणे हे जास्त समृद्ध करणारे आहे. अगोदरच कोरडी व्याख्या देण्याने काहीसा रसभंगच पत्करावा लागेल. ज्या वाचकांना संज्ञेपेक्षा भाव जवळचा वाटतो त्यांनी खालील मजकूर आता टाळून हृद्‌गतवाचनानंतर तो वाचण्यात त्यांना लाभ आहे.

परंतु लेखकास, त्याने काय करायला घातले आहे याबाबत पारदर्शक रहाण्याचे, कर्तव्यही बजावायला हवेच. म्हणूनच उपशीर्षकापासून वापरलेल्या 'आधुनिकतावाद' या संज्ञेची सूत्रमय,

संक्षिप्त व पारिभाषिक संज्ञांनी संपृक्त अशी रूपरेखा येथे देत आहे. ग्रंथाचा मुख्य विषय हा नसल्याने त्यांची अधिक उकल करून सांगणे येथे शक्य नाही. त्यामुळेही ती ओलांडून पुढे जाणे अधिक सुगम ठरू शकेल.

आधुनिकपूर्व व आधुनिक यात जरी कालक्रमही असला तरी तो गौण असून व्यापक जीवनसरणी म्हणून त्यांच्यात स्वरूपतः काय भेद आहेत हे महत्त्वाचे. अधिकच विद्रोही असलेल्या वाचकांना माझा आधुनिकतावादही जुनाट वाटू शकेल! तसेच आधुनिकतावाद ही सर्वसहमती प्राप्त असणारी संज्ञाच नव्हे. अनेक 'रंगांचे' आधुनिकतावाद प्रचलित आहेत. त्यापैकी प्रस्तुत लेखकाचा रंग कोणता हे माहीत असलेले बरे. त्या रंगाशी सहमत नसलेल्यांनाही हृद्गतातील आवाहन निदान जवळचे वाटेल एवढीच अपेक्षा आहे.

'स्वधर्म' या शब्दाच्या आधुनिकपूर्व अर्थापेक्षा आधुनिकतावादी अर्थ कसा वेगळा होतो यापासून सुरुवात करू. व्यक्तीला जन्मनियत व पूर्वदत्त असा जो भूमिकासंच 'लाभतो' त्यातील भूमिकांनुसार असणाऱ्या कर्तव्यांशी निष्ठा म्हणजेच आधुनिकपूर्व अर्थाने 'स्वधर्म'. आधुनिकतावादी जीवनसरणीनुसार व्यक्तीचा भूमिकासंच हा कायमचा चिकटलेला नसून वेळोवेळी अर्जित केला जातो. भूमिकांचे आशयही बदलत असतात. हे आशय, निदान अंशतः तरी, देवाण-घेवाणीद्वारे पारस्परिक कर्तव्यनिश्चिती करण्यातून (करारांतून) ठरत असतात. यामुळेच व्यक्ती ही तिच्या भूमिकासंचात बुडून न जाता भूमिकासंचाला पुरून उरते. 'स्वधर्म' चा आधुनिकतावादी अर्थ व्यक्तीची स्वतःप्रती असणारी कर्तव्ये असा बनतो. स्वधर्म आणि भूमिकाधर्म यांच्यात तोल राखण्याची कसरत आधुनिकतावादी व्यक्तीला करावी लागते. (व हा ताप टाळण्यासाठी आधुनिकांना 'आधुनिकपूर्व' चे आकर्षणही वाटत रहाते.) व्यक्तीची अनन्यता (जी अनन्यताच राहूनही, आयुष्यक्रमात काहीशी उलगडत व काहीशी घडविली जात असते) लक्षात घेऊन तिने अभिरुची संवर्धन, क्षमता संवर्धन व क्षमतांचे इष्टतम उपयोजन करायचे असते. सतत उत्कर्षाचा ध्यास हा आधुनिकतावादानुसार दुर्गुण नसून सद्गुण मानला जातो. आधुनिक व्यक्तीला गतिमान स्वधर्म आणि गतिमान भूमिकाधर्म या दोहोंचे शोधन करत रहायचे असते.

आधुनिकतावादी व्यक्तीला प्रस्थापित विधिविधान म्हणजेच नैतिकता असे सोपे समीकरण मानता येत नाही. स्वतःच्या श्रेयचक्षूने नैतिक निवाडे करत, प्रस्थापित विधिविधानांचे पालन/उल्लंघन, प्रस्थापन/नूतनीकरण करायचे असते. (येथे उल्लंघनात सत्याग्रही चळवळ अभिप्रेत आहे. भ्रष्टाचार व गुन्हेगारी नाही.) म्हणजेच आधुनिकतावादी व्यक्ती ही स्वरूपतःच 'राजकीय व्यक्ती' असते. परंतु वास्तवात तिचे राजकीय व्यक्तित्त्व प्रस्थापित सत्तासंतुलनात दडपले जात असल्याने तिला संघर्ष/समन्वय करत स्वतःच्या निवाड्यांचा प्रसार करावा लागतो. (इतरांचे निवाडेही समजून घ्यावे लागतात.)

आधुनिकतावादी जीवनसरणीनुसार स्वहित-साधना हे स्वतःच दुरित नसते. व्यक्तीच्या अंतर्गत स्वहितकल्पनेत येणाऱ्या विसंगती, पारस्परिक हितकल्पनांत येणाऱ्या विसंगती व 'सर्वहित' कल्पना आणि स्वहितकल्पना यात येणाऱ्या विसंगती कसकशा कमी करत नेता येतील हा श्रेयसाधनेचा (दुरित सौम्यीकरणाचा) प्रश्न असतो. श्रेयचक्षूबरोबरच सुसंगती तपासू/शोधू/जुळवू शकणारी प्रज्ञाही प्रत्येक व्यक्तीला लाभलेली आहे, असे आधुनिकतावाद्यांचे गृहीतक असते. अर्थात ही प्रज्ञा अद्याप पुरेशी जागृत व सक्षम झालेली नाही याची वास्तवदर्शी जाणीवही त्यांना असते. "स्वयंप्रज्ञ विचार करण्याचे धैर्य दाखवा" ही आधुनिकतावादाची मुख्य घोषणा असते.

व्यक्तींना लाभणाऱ्या सत्ता, मालमत्ता, सन्मान व मनःपिंडात्मक-वृत्ति/क्षमता या सर्व संपदांचे विषम वाटप झालेले असते. ते अंशतः कर्तृत्वावलंबी व अंशतः भाग्यावलंबी असते. कर्तृत्वालंबी अंशात न्याय्य व अन्याय्य असे दोन्ही प्रकार असतात. असे असूनही,

अनुक्रमणिका

'माझ्या स्वातंत्र्याइतकेच अन्यांचे स्वातंत्र्य आदरणीय आहे.' या जाणिवेने सर्व मानवी व्यक्तींना, मानवी व्यक्ती म्हणून समान प्रतिष्ठा असते. यामुळे इतरांच्या आत्मोद्धाराला वाव राहील याची काळजी घेणे हे प्रत्येकाचे कर्तव्य बनते.

आधुनिकतावादानुसार "माणूस हा मूलतः वाईटच असून त्याला वठणीवर आणणारी दंडशक्तीच आवश्यक आहे" हेही खरे नसते व "माणूस मूलतः चांगलाच असून त्याला मोकळे सोडले की तो आपोआप पारस्पारिकतेने नांदेल" हेही खरे नसते. म्हणूनच 'वठणीवर आणण्याचा' भाग किमान रहावा, तो चांगुलपणाला वाव ठेवणारा रहावा व त्याचा आधार फक्त संघर्ष व त्यातून ठरणाऱ्या बल-संतुलनात न रहाता चांगुलपणातही रहावा, हे तत्त्व स्वीकारावे लागते. लादणुकीवर आधारित सामाजिक संस्थांची जागा संमतीवर आधारित अशा सामाजिक संस्था घेत जातील असा आधुनिकतावादाचा संस्थात्मक कार्यक्रम बनतो.

आधुनिकतावादानुसार न्याय्यतेची प्रस्थापना हे माणसाचेच कार्य असते. पण ते करण्याच्या भरात अन्यायच वाढून बसू नये याचीही काळजी त्याने घ्यावयाची असते. भाग्याची कधीही 'दैवी न्यायाशी' किंवा काव्यगत न्यायाशीही गल्लत न करणे, भाग्यावलंबी भाग कमी कमी करत नेऊन कर्तृत्वावलंबी भाग वाढत जाईल असे भौतिक बदल करणे, कर्तृत्वावलंबी भागात न्याय्यता वाढत जाईल असे सामाजिक बदल करणे, शक्य तेथे भाग्यांचेही पुनर्वाटप करून त्यांची धार सौम्य करणे, उर्वरित भाग्य हे कटुता-सूडचक्र-असूया या दुरितांत न अडकू देता उमदेपणाने स्वीकारणे, अन्यायग्रस्तांचे सबलीकरण व दुर्भाग्य-ग्रस्तांचे सक्षमीकरण करणे, जन्म हा पूर्णतः भाग्यावलंबी असल्याने संधीची उपलब्धता जन्माधिष्ठित न राहू देणे, असा एकूण न्यायविषयक कार्यक्रम बनतो. ईश्वर, पुनर्जन्म, अतींद्रियशक्ती व चमत्कार या गोष्टी काही (बऱ्याच!) व्यक्तींच्या प्रकृतीनुसार त्यांच्या व्यक्तित्वविकासाला आवश्यक असतीलही, परंतु न्यायप्रस्थापनेच्या कार्यात व एकूणच नैतिक निवाड्यांमध्ये त्यांचा शिरकाव न होऊ देणे हे आधुनिकतावाद्याचे व्रत असते. मग त्यांच्या अस्तित्वाविषयी त्याचे मत काहीही असो.

आधुनिकतावादानुसार मानवी ज्ञान हे चुकतमाकत, शिकत जाणारे, नेहमीच अपूर्ण व सुधारण्याजोगे रहाणारे असते. ते अंतिम कधीच नसते. पण याचा अर्थ असा नव्हे की ते व्यक्तिसापेक्ष/मनोदशासापेक्ष/परिप्रेक्ष्यसापेक्षच राहील. मानवी ज्ञानात सहमतीचा भाग लक्षणीयपणे मोठा आहे. ही सहमती केवळ सोयीस्कर सहमती नसून प्रत्येकाला ज्यात 'हे मी कोणालाही पटवून देऊ शकेन' हा आत्मविश्वास असेल असे हे समाईक ज्ञान असते. बिनतोड युक्तिवाद आणि कोणालाही पडताळा (मग तो बहिःसाक्ष्यच नव्हे तर अंतःसाक्ष्यही असेल) या आधारावर समाईक ज्ञान विकसित होत रहाते. जे ज्ञान खासगी व व्यक्तिविशिष्ट असेल ते व्यक्तींना समजून घेण्यासाठी, वैविध्यांना सामावून घेण्यासाठी उपयुक्त, पण सार्विक नियम बनवण्यासाठी अनुपयुक्त मानले पाहिजे. कोणताही ज्ञानप्रस्ताव हा आव्हानित होण्यासाठी खुला असला पाहिजे. कोणाचाच शब्द किंवा अज्ञात स्रोतातून आलेला शब्द प्रमाण मानला जाता कामा नये. व्यवहारात विश्वासार्हता आवश्यक असल्याने 'आप्तवाक्य' प्रमाण ठरते. पण ही आप्तता कोणालाच कायमची बहाल केलेली नसते. आप्तता ही शब्देतर प्रमाणांनीच सिद्ध असली पाहिजे. सार्विक निकषांची कुऱ्हाड नवजात ज्ञानप्रस्तावांवर चालवू नये. पण हे अभयदान कायमसाठी नाही. नव्या ज्ञानप्रकारांना समाईक ज्ञानात प्रवेश मिळविण्यासाठी, पुरेशी वाढ झाल्यानंतर, सार्विक निकषांना सामोरे जावेच लागेल.

प्रत्येक वक्त्यावर ही जबाबदारी हवी की त्याला आपल्या वक्तव्याची बोधगम्यता, तथ्यपूर्णता, औचित्य व मनःपूर्वकता समोरच्याला पटवून द्यावी लागेल. यासाठी प्रामाणिक संवाद निर्भीडपणे करण्याचे वातावरण हवे. संवादक्षमता वाढणे सर्वांनाच हितावह

आहे. याचा अर्थ असा नव्हे की समाईक ज्ञान हे 'जनमत--चाचणीने' ठरेल. संवादाद्वारे प्रत्येकाची अंतःप्रज्ञा (जी समाईक मानवी प्रज्ञा आहे) जागृत व संतुष्ट करावी लागेल. संवाद तोडणारे चिंतन आणि चिंतनाला भरकटवणारे संवाद हे दोन्ही सारखेच धोक्याचे आहेत. स्वगतप्रज्ञा व संवादीप्रज्ञा यांची परस्परपूरक वाढ पाहिजे.

साधनांतील प्रगतीने साध्यांतील उन्नती आपोआपच होईल हे जसे खरे नाही तसेच साध्यांतील उन्नती ही साधनांतल्या प्रगतीशिवाय स्वतःच होत राहील हे ही खरे नाही. प्रगतीने मिळवून दिलेला वाव उन्नतीसाठी वापरणे/न वापरणे ही नैतिक निवडच राहील. नैतिकदृष्ट्या कितीही आदर्श कल्पना असली तरी तिला व्यवहार्यतेच्या कसोटीपासून मुक्तता नाही. मानवाच्या कथेला परिपूर्णता कधीच येणार नसली व तिच्यात चढ उतार होत असले तरी, एकूण दिशा आशादायक राहते अशी आधुनिकतावादाची पक्की धारणा आहे.

माणसाला त्याच्या लौकिक समस्यांच्या पलीकडे जाण्याचा, ऐहिकाच्या पार होण्याचा ध्यास असतो. मानवमतिगम्य अशा जगाच्या पलीकडील परमतत्त्वाचा शोध घ्यावासा वाटतो. स्वतः परिपूर्ण बनणे शक्य नसले तरी परिपूर्ण अस्तित्वाचे चिंतन करणे थांबवता येत नाही. जगतावर अवलंबित नाही अशा आत्मतृप्त अवस्थेत पोहोचण्याचे आवाहन त्याला साद घालीत असते. 'कैवल्याच्या चांदण्याला' भुकेला असा हा चकोर फक्त चांदण्यावर जगू मात्र शकत नाही. त्यामुळे त्याच्या धडपडीला ऐहिक व पारमार्थिक अशी अंगे असतात. आधुनिकतावाद आणि परमार्थ यांच्यात माझ्यामते पूरक संबध शक्य आहे. ही पूरकता कशी शक्य आहे? हाच या ग्रंथाचा एक महत्त्वाचा विषय असल्याने त्याचे उत्तर येथे मांडणार नाही. येथे याबाबतीत एवढेच सांगू इच्छितो की आधुनिकता-वादाच्या काही प्रवाहात जडवाद, उपयुक्ततावाद, निरीश्वरवाद व फक्त विज्ञानाशीच निष्ठा या गोष्टी जणु काही आधुनिकतावादी रहाण्यासाठी आवश्यक पूर्व अटी आहेत असे गृहीत धरले जाते. परंतु माझ्या मते हे आवश्यक नाही उलट घातकच आहे. तसेच मानवातील या सच्चा ध्यासाला 'सत्ताधाऱ्यांचा सोयिस्कर प्रचार' समजणे हे तर अधिकच उथळपणाचे आहे. आंग्लेतर युरोपीयांची तत्त्वज्ञानातील चळवळ भारतात (मार्क्स वगळता) कमी पोहोचली या दुर्दैवी योगायोगामुळे आधुनिकतावादाचे एक संकुचित (जडवाद उपयुक्ततावाद–विज्ञाननिष्ठा व अध्यात्मविरोध) प्रारूपच प्रचलित झाले. परंतु सखोल व समृद्ध आधुनिकतावाद असा संकुचित नाही. तसेच उलट्या बाजूने, अध्यात्म हे देखील ऐहिक अभ्युदयाला मारकच असू शकते हेही खरे नाही. किंबहुना प्रवृत्तिवादी परमार्थ, इहवादी आत्मविद्या शक्य आहे हाच नवपार्थ हृद्गताचा मुख्य प्रतिपाद्य विषय आहे.

आधुनिकतावादाची वरील रूपरेषा ही सर्वांगस्पर्शी झालेली नाही. तिच्यात स्त्री–पुरुष, राष्ट्रकल्पना यासारखे कित्येक विषय थेटपणे आलेले नाहीत. परंतु येथे आधुनिकतावाद या विषयावर ग्रंथ लिहायचा नसून लेखकाने स्वतःच्या भूमिकेविषयी पारदर्शक रहाण्याचे कर्तव्य बजावणे एवढाच मर्यादित हेतू आहे. या मर्यादित हेतूने वरील रूपरेषा पुरेशी ठरावी असे वाटते.

❖❖❖

समीपार्थी इंग्लिश शब्दसूची व इंग्लिश टीपा :

'कोण हा नवपार्थ'

दर्शशास्त्रीय सरमिसळ - metaphysical heterogeneity

मानसिकता – mindset, ethos

बह्वर्थसूचकता – Polysemy, equivocality

वैधीकरण – legitimization

विसंगती – inconsistany

समग्र जीवनसृष्टी – overall attitude towards life

सयुक्तिकता – amenability to, reason/rational argument

अस्फुट – implicit
(सार्थ) – accompanied by translation
संहिता – text expression of cosmic spirit, as against illusion doctrine.
आध्यात्मिकता – spirtuality (transcendental pschology)
सेश्वर दार्शनिक – philosophical theist
निवृत्तिवाद – doctrine of abstinence, withdrawl, quietism
लक्ष्यबिंदू – focus
मायावाद – grand illusion doctrine
कर्तृधन्यता – joy of integrity in agenthood.
ऐहिक अभ्युदय – wordly upliftment, 'progress'
आत्मावस्था – state of harmony within one self.
परमार्थ – summum bonum (greatest good), final telos
भाषिक वळण – idiom
प्रवृत्तिवादी – with the spirit of endeavor & involvement
चर्चाविश्व – discourse
कर्मयोग – dispassionate loyalty towards 'task' (for purifying soul of its passions)
अर्थांकन – interpretation (not mere decoding but birth of meaning)
कर्तृयोग – dissolving alienation without relegating, agenthood/doer-ness
भावार्थ क्षितिज – range of meanings
नास्तिक – anti-transcendentalist, atheist, non spiritualist.
भावविश्वातला ईश्वर – humanly construed God
गूढवाद – obscurantism (mysticism for communion with cosmic spirit)
स्वयंमात्र ईश्वर – God by himself (being irrespective of himan consciousness)
चिद्विलासवाद – the doctrine of playful self
अनुसाद – Paraphrasing of a verse with a pro-attitude
प्रतिसाद – commenting on a verse with con-attitude
स्वयंसाद – one's own comment not exactly connected with a particular verse.
प्रश्न ! जे उपस्थित करायचे राहून गेलेत ! !
शुभद्रोह – benevolent insubordination
मोक्षपुरुषार्थ – telos of emancipation (from worldly life into eternal bliss)
दिव्यकथा – myth involving supernatural powers.
'बद्ध' – non-emancipated spititually (but not unfree in terms of 'will')
विधिविधान – Law giving statement (with religious sanction)
कर्मविपाक – fruction of acts as per their (good/evil) character incurring to the actor but not in same birth-life.
नीतिजिज्ञासा – ethical, inquiry/quest.
लोप – fading out, diminishing to zero
धर्मपुरुषार्थ – telos of 'Duty'
संकर – impurification of lineage due to violation of endogamy
विषय – object (of consciousness in general & of desire in particular.)
यादृच्छिक – random, fortuitous, chance (adj)
जीव – organism, embodied mind.
तामसी – syndrome of interia & ignorance in character.
प्रकृति नियत – determined by nature.
आसुरी – devilish, wicked, demonic
मायिक असत् – sensibly real but deemed as

unreal on account of the grand illusion doctrine.

आत्यंतिक – at ideational extremit, absolute, theoretical limit taken as actual.

फलहेतुकता – result orientation, fruit seeking attitude (in action)

निरास – dissolution

सम्यक् – appropriate, 'Right'

ज्ञानोत्तर – after spitually emancipating enlighenment.

अहंकार – self (centre of continuing dientity, ipseity)

पारंगत – one who has reached 'beyond', transcended

आत्मा – pure subject (representation of transcenental ubject)

संकल्प – volitional resolve.

अविकारी – 'free' from being affected, unperturbed.

सात्त्विक – calm, alert & effortlessly virtuous

अकर्ता – non-doer, devoid of agenthood.

दैवी – one who has innate sacred endowment

नाकर्ता – slothful, indolent

राजसी – exuberant, endeavoring, fruit seeking

श्रेयपूर्णता – meritorious-ness, worthy ness

गुणत्रय – the traid of character syndromes (सत्त्व रज तम)

धन्यता – esteem, sentse of accomplishment

संपत्तिद्वय – the dyad of angelic & demonic endowments.

विवेक – faculty of discernment

जीवात्मा – empircal subject (in a particular organism)

काम – desire, eros

सकृत्दर्शनी – prima facie

दमन – repression

सर्वेश्वरवाद – pan-theism

'आधुनिकतावादी' या संज्ञेत प्रस्तुत लेखकास काय अभिप्रेत आहे?

आधुनिकतावाद – modernism (contemporary phase of 'the unfinished enlightenment project')

स्वहितसाधना – pursuing self-interest

जीवनसरणी – way of life

स्वतःच दुरित – per se evil

स्वधर्म (आधुनिक पूर्व) – loyalty to one's station (ascribed, & birth based permanent role-set)

अंतर्विरोध – internal conflict (yet unresolved)

स्वधर्म (आधुनिक) – commitment to one's own self search & realizing the project emerging out of one's unique individualiy.

प्रज्ञा – faculty of Reason (सयुक्तिकता amenability to reason)

अर्जित – earned, achieved

संपदा – assets

भूमिकाधर्म (आधुनिक) – comittment to dynamic role-set & honoring of the contracts.

कर्तृत्वावलंबी – dependant on human endeavor

शोधन – search for integration (& not 'purification')

भाग्यावलंबी – fortuitous.

विधिविधान – legislation

ग्रस्त – aggrieved party, victim

अनुक्रमणिका

श्रेयचक्षु – faculty of conscience (intuitive)
उमदेपणा – elegance
सत्याग्रह – violating a law with prior notice, pleading 'guilty' & accepting punishment, inducing soul searching in the advocates of the established law.
न्याय्यता – fairness
नैतिक निवाडा – moral judgement.
सबलीकरण – empowerment
आव्हानित होण्याजोगे – contestable
सक्षमीकरण – enablement
बिनतोड युक्तिवाद – logical demonstration
नीतिशास्त्रीय इहवाद – ethical secularism (disregarding the universally irredeemable metaphysical claims in axioms of ethic)
कोणालाही पडताळा – universal testability
सुधारण्याजोगे – corrigible (not implying relativism)
बहि: साक्ष्य – available to sensory intution
साधनातील प्रगती – progress in means
अंत: साक्ष्य – available to cogitative intuition.
साध्यांमधील उन्नती – benevolence in ends
शब्दप्रामाण्य – surendering validation to scriptures
इहापार जाण्याचा ध्यास – quest of transcending the pragmatic realm
आप्तवाक्य – communication from person who has proved her trustworthyness
परमतत्त्व – ultimate principle available to speculation or 'revealation' (divine)
बोधगम्यता – intelligibility
आत्मतृप्त अवस्था – contendedness irrespective of wordly situation.
तथ्यपूर्णता – factual truth
कैवल्याचे चांदणे – bliss of the Absolute.
औचित्य – propriety, (validity based on mutually accepted norms)
आंग्लेतर युरोपिय – continental (philosophy)
मन:पूर्वकता – authenticity.
सखोल आधुनिकतावाद – modernism that is not restricted to 'materialism, utilitarianism, scientism, positivism'
स्वगतप्रज्ञा – monological Reason
इहवादी आत्मविद्या – spiritual pursuit that is in tune with ethical secularism
संवादीप्रज्ञा – dialogical Reason
प्रवृत्तिवादी परमार्थ – Idea of final Telos that is in tune with endeavor orientation.

ooo

अनुक्रमणिका






**काल, आज आणि उद्या**

# मनुष्याची उत्क्रांती : एकमेव आणि अद्वितीय

**साक्षी**

'मनुष्य हा द्विपाद प्राणी असून तो आपल्या दोन पायांनी चालतो' असे माणसाचे वर्णन प्राचीन विचारवंतांनी केले होते. माणसे भाषेचा उपयोग करून परस्परांशी बोलतात म्हणून काही जणांनी 'मनुष्य बोलका प्राणी आहे' असे त्याचे लक्षण सांगितले आहे. ॲरिस्टॉटलने मनुष्याचा मुख्य गुण बरोबर हेरला व 'मनुष्य हा विचार करणारा प्राणी आहे' असे म्हटले. समोर आलेल्या प्रसंगाला माणसे विचारपूर्वक तोंड देतात तर जनावरे सहज प्रेरणेने परिस्थितीला सामोरी जातात. 'विचार करणे' हे मनुष्याचे चिन्ह आहे, असे मानले गेले आहे. काही सस्तन प्राणी व नरवानरगणातील काही प्राणी (प्रायमेट्स्) प्राथमिक पातळीचा विचार करीत असावेत असे निरीक्षणावरून दिसते. पण संकल्पनात्मक विचार फक्त माणसालाच शक्य होतो, असे म्हणावे लागते.

माणसाचे हे वैशिष्ट्य आहे की, मनुष्याचे वर्तन काही मूल्ये गृहीत धरून चालत असते. माणूस आपल्या विचारांना मोकाट सोडत नाही; त्या विचारांना विशिष्ट मूल्यांच्या दिशेने वळविण्याचा त्याचा प्रयत्न असतो. त्यामुळेच समाज करून राहता येणे शक्य झाले आहे. 'जीवो जीवस्य जीवनम्' हा निसर्गाचा न्याय आहे, असे माणसाचा विचार त्याला सांगतो पण त्याच बरोबर सामर्थ्यवन्ताने दुबळ्याला आधार दिला पाहिजे अशी मनुष्याला मिळालेली सनातन शिकवण आहे. या दोन वृत्तीतील लढा २१ व्या शतकात आणखीच तीव्र होणार, अशी चिन्हे आहेत. कारण शुद्ध हवा, स्वच्छ पाणी, उपभोग्य वस्तूंच्या उत्पादनासाठी लागणारी ऊर्जा ही मनुष्याच्या सुखाची साधने दुर्मिळ होत जाणार आहेत.

मनुष्यावर ही जी हातघाईची वेळ येऊ घातली आहे तिची पाळेमुळे फार दूरवर गेलेली आहेत.

**(१)**

सूर्य आणि त्याची ग्रहमाला ही आज आपल्याला माहीत असलेल्या स्थितीला साडे चारशे कोटी वर्षांपूर्वी पोचली; आणि नंतरच्या पन्नास कोटी वर्षात केव्हातरी पृथ्वीवर जीवाची (लाईफ) निर्मिती झाली असावी. ह्या जीवबीजापासून काळाच्या ओघात, टप्प्या-टप्प्याने नानाविध जीवसृष्टीचे उत्पादन झाले. जीवसृष्टीत वनस्पती व प्राणी असे भाग पडले. प्राण्यांमध्ये पृष्ठवंशी प्राणी हा महत्त्वाचा प्राणिसंघ आहे. या प्राणिसंघातच सुमारे २८ कोटी वर्षांपूर्वी सरपटणारे प्राणी (रेप्टाईल्स) निर्माण झाले. या सरपटणाऱ्या प्राण्यांच्या ठिकाणी शरीराचे तपमान नियंत्रित करण्याची शक्ती नव्हती. शरीराबाहेरचे तपमान वाढले की, यांची शरीरे तापत असत व हवा थंड झाली की, यांची अंगे गार पडत. सुमारे ६।। कोटी वर्षांपूर्वी हे सरपटणारे प्राणी बहुतेक नष्ट झाले. सुसरी, कासवे, साप यांच्या रूपाने या सरपटणाऱ्या प्राण्याचे अवशेष आजही जिवंत आहेत.

शरीराबाहेरच्या हवेचे तपमान कमी जास्त झाले तरी शरीराचे तपमान ज्यांना कायम राखता येते अशा दोन प्राणिजाती सरपटणाऱ्या प्राण्यांमधून उत्क्रान्त झाल्या.

एक पक्षी व दुसरी सस्तन प्राण्यांची जात. सस्तन प्राण्यांची खासियत अशी की, आपल्या संततीला दूध पाजून आई तिचे संगोपन करते. या सस्तन प्राण्यांपैकी (प्रायमेट्स्) हा महत्त्वाचा. नरवानरगणाची दृष्टी ही तीव्र असते व बाहेरच्या जगाशी संबंध ठेवताना हे प्राणी दृष्टीचा जास्त उपयोग करतात. त्यांचे डोळे डोक्याच्या समोरच्या भागात असल्याने त्यांना समोरचे दृश्य त्रिमितीमध्ये पाहता येते. नरवानरगणेतर जे सस्तन प्राणी आहेत त्यांचे डोळे डोक्याच्या दोन बाजूंना

अनुक्रमणिका

बसवलेले असल्याने त्यांना सारे देखावे सपाट दिसतात. पण बाह्य सृष्टीचे ज्ञान मिळवण्यासाठी अशा सस्तन प्राण्यांची घ्राणेंद्रिये तीक्ष्ण झालेली आहेत. नरवानरगणाने आपले निशाचरत्व- म्हणजे रात्री हालचाली करण्याची सवय- टाकून दिवसा अन्नाचा शोध घेण्याला सुरुवात केल्यानंतर त्यांना रंगा-रंगातील फरक कळून येऊ लागला. झाडांच्या फांद्या धरून उड्या मारण्याची सवय त्यांनी केल्यावर डोळे व हात यांची सांगड घालण्याचे कसब त्यांच्या मेंदूला समजले. त्यांच्या हाताच्या पंजाला चार बोटे व अंगठा असे अवयव फुटून मूठ वळता येऊ लागली. वानरगण टोळ्या करून राहू लागला. त्यांच्यातील माद्यांना एका वेळी एकच पिल्लू होऊ लागले व त्यांचे दीर्घकाळ लालन-पालन टोळी करू लागली.

(२)

वानरांचे हे सारे गुणधर्म जास्त प्रकर्षाने मनुष्यातही आढळतात. पण गुणधर्माचा प्रकर्ष जास्त असल्याने मनुष्य वानरांपासून निराळा पडतो असे म्हणता येत नाही. मनुष्याच्या ठिकाणी ताठ उभे राहाणे, दोन पायांवर चालल्याने हातांचा उपयोग हत्यारे करण्यासाठी व वापरण्यासाठी करता येणे हे दोन अगदी वेगळ्या प्रकारचे गुण आहेत. त्यामुळे माणूस वानरांपेक्षा वेगळा पडतो. पण त्याहूनही आगळी-वेगळी अशी गोष्ट माणसापाशी आहे. ती म्हणजे भाषा, भाषेमुळे माणसे एकामेकांशी बोलू शकतात हे तर झालेच पण ती आपले पिढ्यापिढ्यांचे अनुभव जतन करून ठेवतात. इतर अनेक प्राणी आपल्या पिलांना शिकवतात; पण मनुष्य हा एकच प्राणी असा आहे की, त्याने संततीला दिलेल्या शिक्षणातून अनेक पिढ्यांचे एकवट ज्ञान पुढच्या पिढीकडे जाते. माणसे टोळी करून राहतात; पण तसे राहातांना त्यांचे परस्परावलंबन, सहकार्य व श्रमविभाजन यांचे प्रमाण वानरांच्या टोळीतील याच विशेषांपेक्षा अधिक समृद्ध असते.

पर्यावरणातील घडामोडींना इतर प्राणी जे तोंड देतात त्यामध्ये सहज-प्रेरणा व तात्कालिकता या दोन गोष्टी प्रकर्षाने आढळतात. पण माणूस अशा घडामोडींना जास्त धोरणीपणाने व दमा-दमाने सामोरा जातो. मनुष्यापाशी अनेक पिढ्यांचे जे ज्ञानसंचित असते त्यामुळे त्याच्या हालचाली सहज प्रेरणेने न होता विचारपूर्वक होतात. आलेल्या प्रसंगाशी कशाप्रकारे सामना करायचा, कोणते पर्याय आपल्याला उपलब्ध आहेत, सामना करण्याचा उद्देश कोणता अशा सर्व गोष्टींचा मनुष्य तारतम्याने आढावा घेतो व पुढील कृती ठरवतो. जिथे पर्यायांची उपस्थिती असते तिथेच काय स्वीकारायचे किंवा सोडायचे हे ठरविण्याचे निकषही हजर असतात. यातून मूल्यविषयक विचार उद्‌भवतो, आणि एकदा मूल्ये म्हणून काही असतात असे ठरले की, त्यांच्या चिंतनातून नीती व अध्यात्म यांच्या विषयींच्या संकल्पनांचा उदय होतो. संकल्पना हा मनुष्याच्या चिंतनाचा प्रधान विषय आहे व मुख्य आधारही आहे.

बाह्य सृष्टीचे ज्ञान मनुष्याला रस, रूप, गंध, शब्द आणि स्पर्श या संवेदनांच्या द्वारे होते. विषय आणि या संवेदना देणारी इंद्रिये यांची गाठ पडते तेव्हा त्याविषयीचा संस्कार मेंदूवर होतो. जेव्हा त्याच विषयाचा संस्कार मेंदूवर वारंवार होतो तेव्हा त्या विषयाची संकल्पना मेंदूत तयार होते. एका संस्कारामुळे संकल्पना निर्माण होत नाही; पुनः पुनः संस्कार घडावा लागतो. तथापि, एकाच मनुष्याच्या मनात संकल्पना तयार होऊन भागत नाही; अनेकांच्या मनात तीच संकल्पना त्याच विषयाचे संस्कार वारंवार घडून निर्माण व्हावी लागते. एरवी एखाद्या माणसाला वारंवार झालेल्या भ्रांतीतूनही संकल्पना निर्माण होऊ लागेल. हे कसे होते हे समजण्यासाठी आपण 'खुर्ची' ही संकल्पना घेऊ. खुर्ची ह्या वस्तूकडे एका 'अ' या माणसाने निरनिराळ्या दिशांनी व कमी जास्त प्रकाशात पाहिले. त्यामुळे त्याच्या मेंदूवर, निरनिराळी छायाचित्रे उमटावीत तसे, नाना संस्कार झाले. नंतर त्याच माणसाने त्या खुर्चीला स्पर्श केला, निरनिराळ्या ठिकाणी स्पर्श केला; खुर्चीला लावलेल्या रोगणाचा त्याला वास आला; त्या रोगणामुळे

अनुक्रमणिका

खुर्चीला आलेला काळसर-तपकिरी रंग त्याला दिसला; या सर्वांचे संस्कारही त्याच्या मेंदूवर झाले. खुर्चीचे वजन, आकार, तिचे निरनिराळे भाग यांचेही संस्कार 'अ'च्या मेंदूने पकडले असणार. 'अ' ने हे सर्व संस्कार एकत्र करून 'खुर्ची' ही संकल्पना तयार केली. हीच गोष्ट 'ब' ने देखील केली. नंतर 'अ' व 'ब' या दोघांनीही 'खुर्ची' या उच्चाराने त्या संकल्पनेला संबोधण्याचे ठरवले; तर काय होईल? इथून पुढे खुर्ची समोर नसतानाही ते खुर्ची विषयी बोलू शकतील. 'खुर्ची' ही संकल्पना व तिला अनुलक्षून बोलणे हे शक्य होण्याचा खुलासा असा असला पाहिजे. भाषा ही अशा रीतीने संकल्पनांमुळे शक्य होते.

आपण संकल्पनांशी खेळ करू शकतो. एक, दोन, तीन, ...... पंचवीस हजार तीनशे एकवीस इ. संख्या ह्या देखील संकल्पनाच आहेत. आपण त्यांच्यावर बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार इ. द्विपद क्रिया करू शकतो. त्यातून संकल्पनात्मक चिंतन निर्माण होते. मूल्ये, नीती, सौंदर्य, नियम इत्यादी गोष्टी संकल्पनात्म चिंतन जसे जसे वरच्या पायरीवर जावे तसतशा निर्माण होत गेल्या आहेत. हे विषय म्हणजे संकल्पनाच आहेत. चिन्हांकित तर्कशास्त्र आणि गणित ह्या संकल्पनात्म चिंतनातून निर्माण झालेल्या फारच उच्च श्रेणीतील संकल्पना आहेत.

संकल्पनात्म चिंतन साध्य होण्यासाठी फार मोठी धारणाशक्ती असणारा मेंदू असावा लागतो. त्या मेंदूत अनेक स्मृती किंवा संस्कार साठवून ठेवता यावेत, यासाठी प्रचंड संख्येने कोशिका हव्यात. प्रत्येक कोशिकेतील स्मृती/संस्कार दुसऱ्या कोशिकेतील स्मृति/संस्काराशी पाहिजे तेव्हा व ताबडतोब जोडता येतील अशी यंत्रणा हवी. याच्याच जोडीला घशातील स्वरयंत्राचा विकास झाला पाहिजे. किमान पन्नास वर्णांचा उच्चार या स्वरयंत्रातून व्हावयाला हवा. वर्णांचे उच्चार व्हावयाला लागले की भाषा तयार होण्यास वेळ लागत नाही. माणूस प्रथम पासूनच टोळी करून राहात असल्याने भाषा घडून येणे सोपे गेले असावे. संकल्पनात्मक विचार करण्याचे सामर्थ्य, भाषा, अनुभवसंचित वाढवत पुढे जाणारी परंपरा, टोळी करून राहण्याची सवय या सगळ्या गोष्टी परस्परांना मदत करीत विकास पावल्या असणार.

(३)

सुमारे २५ लाख वर्षांपूर्वी नरवानरगणातून बुद्धिमान मनुष्य (होमो सेपियन्) उत्क्रांत झाला. नरवानरगण वृक्षांवर राहात असे. बुद्धिमान मनुष्य देखील नरवानरगणांच्या टोळ्यांतच वृक्षांवरच राहत होता. पण वीस लाख वर्षांपूर्वी मनुष्याने झाडांवर राहणे सोडले व तो जमिनीवर उतरला आणि दोन पायांवर ताठ उभा राहून चालू लागला. आता त्याने हत्यारे बनविण्यास सुरुवात केली. हत्यारे तयार करण्यासाठी संकल्पना निर्माण करण्याची शक्ती मेंदूत असावी लागते. आपल्याला कशा प्रकारचे हत्यार हवे आहे, याचे ढोबळ चित्र मनात असल्याखेरीज दगड कसा फोडून त्याला टोक आणले पाहिजे, हे कळणार नाही. पूर्व आफ्रिकेत ओल्डुव्हाई नावाची दरी आहे. तीमध्ये आदिमानवाची सुरुवातीची दगडी व ओबड-धोबड हत्यारे सापडली आहेत. त्यानंतर दहा लाख वर्षांनी मनुष्याला कुऱ्हाडीचे दगडी पाते तयार करता येऊ लागले. हे अधिक प्रभावी हत्यार करणाऱ्या मनुष्याच्या मेंदूची संकल्पनात्मक विचार करण्याची क्षमता फारच वाढलेली असली पाहिजे.

उत्क्रान्ती होण्यासाठी कोणत्या प्रकारची यंत्रणा काम करत असते, मनुष्याची उत्क्रान्ती होण्यासाठी कोणते घटक कारणीभूत झाले, मनुष्याच्या ठिकाणी कोणत्या क्षमता व कोणत्या प्रकारचे दुबळेपण या उत्क्रांतीच्या वाटचालीत निर्माण झाले, याचा विचार आता केला पाहिजे.

कोणत्याही जीवाची एक पेशी घेतली तर त्या पेशीत एक केंद्रक (न्युक्लिअस) असते. या केंद्रकात दोऱ्यासारखे लांब धागे असतात. त्यांना 'क्रोमोसोम' असे नाव आहे. प्रत्येक 'क्रोमोसोम' डीएन्ए नावाच्या

रसायनाचा बनलेला असतो. प्रत्येक 'क्रोमोसोम'कडे आपण तुकड्या-तुकड्यांची एक साखळी म्हणूनही पाहू शकतो. यातील प्रत्येक तुकड्याला 'जीन' असे म्हणतात. या जीन्समुळे जीवाचे गुणधर्म ठरतात. समजा 'अ' या जीनामुळे डोळ्याचा रंग ठरत असेल व 'अ' या जीनमध्ये काही फरक घडून येऊन नवा जीन 'अ (१)' हा तयार झाला तर त्या जीवाच्या डोळ्याचा रंग बदलेल. जीनमध्ये झालेला फरक हा त्या जीवाच्या उपयोगाचा असेल, त्या बदलामुळे जीवाला अन्न मिळणे शक्य होत असेल किंवा स्वतःचे संरक्षण करणे सोपे जात असेल तर झालेला बदल पुढच्या पिढीकडे संक्रांत होतो. जीन मध्ये होणारे सर्वच बदल काही जीवाला फायदेशीर असतात असे नाही. असे निरुपयोगी किंवा घातक बदल ज्या जीव जातीत पसरत व वाढत जातात त्या जीव जाती कालौघात नष्ट होतात. उपयोगी बदल हे जीवजातीच्या तगून राहण्याला कारणीभूत होतात. निसर्गाने तगून राहू शकणाऱ्या जीव जातीची निवड केलेली असते असे जे म्हटले जाते, त्याचा खुलासा हा असा आहे. असो.

मनुष्याच्या बाबतीत निसर्गाने अवलंबिलेली निवडीची पद्धत काही वेगळीच होती. आपण पाहिले आहे की, एका विशिष्ट परिस्थितीत तगून राहाण्यासाठी विशिष्ट जीवजातीतील अशाच व्यक्ती निवडल्या जातात की, ज्यांच्या जीन्समध्ये त्या परिस्थितीला अनुरूप असे बदल घडून आलेले असतात. माणसातील बदल निसर्गातील कोणत्या परिस्थितीच्या अनुरोधामुळे घडून आले? मनुष्याच्या उत्क्रांतीच्या अगदी अलिकडच्या टप्प्यात मनुष्याने संकल्पनात्मक विचारांची सवय लावून घेतली, भाषा निर्माण केली, अनुभवाचे संचित एका पिढीकडून पुढच्या पिढीकडे दिले जाईल अशी व्यवस्था केली. या सर्व गोष्टींमुळे इतर जीव जातींपेक्षा मनुष्य अद्वितीय ठरला. निसर्गात कार्यकारणभाव नावाचे तत्त्व आहे. हे तत्त्व नक्की काय आहे? तर निसर्गातील घडामोडींचा काही ठरीव क्रम आहे, काही ठरीव कालखंडानंतर होणारे आवर्तन आहे, काही घाट (पॅटर्न) आहे. त्यामुळे क्ष ही घटना आढळल्यानंतर य ही घटना घडेल असा अंदाज आपण बांधतो. या सगळ्याला मिळून आपण 'कार्यकारणभाव' हे नाव देतो. या 'कार्यकारणभावा'चा पुनः पुनः अनुभव घेतल्यामुळे मनुष्याच्या ठिकाणी संकल्पना व नंतर संकल्पनात्मक विचार यांचा उद्भव झाला.

निसर्गातील बहुतेक घडामोडींची आवर्तने होत असतात. घडामोडी या एका ओळीत व एका दिशेने किंवा अस्ताव्यस्त पद्धतीने होत नाहीत; त्या पुनः पुनः व बहुधा त्याच कालावधीने होतात. दिवसानंतर रात्र व रात्रीनंतर दिवस येतो; चंद्र कले-कलेने वाढतो व कमी होतो आणि या एका वृद्धिक्षयासाठी **29½** दिवस लागतात. ऋतुचक्र दर चार महिन्यांनी पुढे सरकते. या प्रकारच्या पुनः पुनः व फिरून फिरून होणाऱ्या घटनातून कार्यकारण भावाचे निष्कर्षण मनुष्याने केले. हे करताना मेंदूचा वापर मोठ्या प्रमाणात करावा लागला. मनुष्याचा मेंदू मोठा होऊन त्याचा आकार १३५० घन सें.मी. इतका झाला. मनुष्याच्या जवळपास येणारा वानरगणातील प्राणी जो चिंपांझी त्याच्या मेंदूचा आकार फक्त ३८० घन सें.मी. इतका आहे. मेंदू मोठा झाल्यामुळे कार्यकारण भावाच्या जाळ्यात आणखी घटना मनुष्याला पकडता आल्या. पुढे काय घडले याचा अंदाज घेण्याची मनुष्याची क्षमता वाढली व तिला नेमकेपणा आला. साहजिकच निसर्गातील प्रतिकूल शक्तींना तोंड देऊन तगून राहाण्याची मनुष्याची ताकद वाढली.

(४)

कार्यकारणभावावरील मनुष्याच्या या भरंवशामुळे जगात मनुष्य कोठेही असला तरी त्याच्या पेशीतील जीन्सची रचना बहुतेक एकसारखीच असते; कारण, आफ्रिकेतील व युरोपातील पर्यावरणात कितीही फरक असले तरी निसर्गाकडून होणाऱ्या निवडीचा निकष कार्यकारणभावाचे नेमके आकलन हाच होता. निवड करताना मेंदूची क्षमता, स्मरणशक्ती आणि जुन्या घटना पुनः पुनः आठवून त्यांना संकल्पनात गोवण्याचे कौशल्य यांच्यावरच भर होता; त्यामुळे भौगोलिक

अनुक्रमणिका





भिन्नतेचा परिणाम या निवडीवर झाला नाही. परिणामी, माणूस आफ्रिकेत अवतरून जगभर पसरला तरी त्याचे जीन्स सारखेच राहिले.

मनुष्याच्या मेंदूच्या क्षमतेत ही वाढ पाच लाख वर्षांपूर्वीपासून सुरू होऊन गेल्या चाळीस हजार वर्षांपूर्वीपर्यंत होत होती. त्या नंतरच्या काळात मनुष्य उत्तम शिकारी बनला, उत्कृष्ट कलावंत झाला, त्याने धार्मिक विचारांना सुरुवात केली. त्याची चित्रकला, संगीत, नृत्य ही सर्व त्याच्या धार्मिक विचारांची अपत्ये आहेत. संकल्पनात्मक विचार करण्याची शक्ती विकसित झाल्यामुळे, मागे म्हटल्याप्रमाणे, मनुष्याच्या ठिकाणी बऱ्या-वाईटाचा म्हणजेच मूल्यांचा विचार उत्पन्न झाला; आणि मूल्य विचाराने आपल्यावर बंधने घालून घेण्याच्या मनुष्याच्या स्वभावामुळे तो इतर प्राण्यांपेक्षा वेगळा ठरला.

तथापि, हा मूल्यविचार व त्यापासून निष्पन्न होणारी नीती, सौंदर्यविचार, किंवा धर्मविचार इ. विचारप्रणाली या एकजिनसी नसून त्या त्या समाजाला अनुसरून असल्याने व प्रत्येक समाज हा वेगवेगळ्या पर्यावरणात विकसित झाल्याने प्रत्येक समाजाची मूल्ये, नीती, धार्मिक विचार यांच्यात विविधता आढळते. जेव्हा असे समाज परस्परांच्या संबंधात येतात तेव्हा त्यांच्यात झगडा उत्पन्न होतो. त्यातून शत्रुत्व, हिंसा व युद्धे निर्माण झाली. आज साऱ्या जगाला भेडसावणारा दहशतवाद हा देखील मूल्यविचारात एकजिनसीपणा (युनिफॉर्मिटी) नसल्याने उद्भवला आहे.

विसाव्या शतकात मनुष्याच्या ज्ञानात फार मोठी वाढ झाली आहे. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात विज्ञानाचा विकास होऊन मनुष्याच्या हाती अण्वस्त्रे पडली व जगाचा संपूर्ण नाश करण्याची ताकत त्याच्या ठिकाणी आली. त्याच शतकाच्या उत्तरार्धात अग्निबाण, उपग्रह आणि अवकाशाचा शोध घेणारे विज्ञान व तंत्रज्ञान माणसाला साध्य झाले. त्यामुळे अण्वस्त्रे जगाच्या पाठीवर कोठेही फेकता येतील असे सामर्थ्य निर्माण झाले. याच्याच जोडीला रेणवीय जीवशास्त्र (मोलेक्युलर बायॉलॉजी) आणि आनुवंशिक शास्त्र (जेनेटिक्स) ही नवी शास्त्रे विकास पावली. त्यातून उत्क्रांतीच्या प्रक्रियेचे इतके सखोल ज्ञान मनुष्याला प्राप्त झाले आहे की, आपल्या स्वतःच्या व इतर प्राण्यांच्या भविष्यात होणाऱ्या उत्क्रांतीचे नियोजन व नियंत्रण तो करू शकतो.

ही सर्व सामर्थ्ये माणूस कशा तऱ्हेने वापरणार, हा एकविसाव्या शतकातील यक्षप्रश्न आहे. कोणत्या मूल्यांच्या मोजपट्ट्या लावून माणूस या नव्या शतकात दर प्रसंगी उपस्थित होणाऱ्या पर्यायातून योग्य तो पर्याय निवडील? कोणती नीतिमूल्ये या निवडीसाठी तो उपयोगात आणील? त्याचे निर्णय व त्याच्या कृती यांच्यावर सुयोग्य नियंत्रण ठेवतील व त्याच वेळी योग्य ते निर्णय व योग्य त्या कृती अंमलात आणण्यास मदत करतील, अशा पद्धतीची प्रशासन व्यवस्था व कायदेकानूंची रचना कोणती असेल? मनुष्याने संकल्पनात्मक विचार करण्याची शक्ती विकसित केली व तीपासून त्याला ही विलक्षण सामर्थ्ये प्राप्त झाली. पण या सामर्थ्यांचा उपयोग करताना जो विवेक वापरायचा त्याचा उपयोग तो करील की नाही? सुदैवाने या प्रश्नाचेही उत्तर मनुष्याच्या उत्क्रांतीची जी माहिती आपण आता घेतली त्यातच सापडते. संकल्पनात्म विचारामुळे विज्ञान व जीवशास्त्रे यांची वाढ होऊन निसर्गावर काबू मिळविण्याचे सामर्थ्य मनुष्याला प्राप्त झाले; त्याच संकल्पनात्म विचाराने मनुष्याच्या ठिकाणी विवेक, मूल्ये, नीती व अध्यात्म यांचे चिंतन करण्याची इच्छा व क्षमता उद्भवली. विज्ञानातून मिळणाऱ्या आसुरी संपत्तीचा बेलगाम पाठलाग माणूस करणार की विज्ञानाला जन्म देणाऱ्या संकल्पनात्मक विचाराचे दुसरे अंग जो मूल्यविचार त्याचे नियंत्रण तो या पाठलागावर ठेवणार, ही भविष्याला कलाटणी देणारी समस्या आहे.

○○○

## लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी लेखकांनी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१) आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२) आपण लेखासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी, काही टीपा असल्यास, त्यासह द्यावेत.

३) महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४) नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही ते यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

— संपादक मंडळ

---

## खुलासा

१) काही अपरिहार्य कारणाने प्रा. अकलूजकर यांचा लेख वेळेवर हाती न आल्याने छापता आला नाही. दिलगीर आहोत.

२) डिसेंबर २००८ च्या अंकावरील 'भारतरत्न पंडित भीमसेन जोशी' यांचे छायाचित्र प्रा. देवीदास बागूल यांनी काढले होते.

३) पं. दत्ता मारुलकर यांच्या भाषणातील, छायाचित्राखाली छापलेला, मजकूर प्रा. देवीदास बागूल यांनीच मिळवून दिला होता.

४) मुखपृष्ठाची सजावट प्रा. देवीदास बागूल यांनीच करून दिली होती. प्रा. देवीदास बागूल यांचे आभारी आहोत.

५) 'या अंकाच्या मुखपृष्ठावर छापलेले श्री. विजय तेंडुलकर यांचे पत्र प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे यांच्या संग्रहातील आहे. प्रा. बर्वे यांचे आभार.'

अनुक्रमणिका

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

### संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु. |
| ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु. |
| ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु. |
| ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु. |
| ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे | २० रु. |
| ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु. |
| ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु. |
| ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु. |
| ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु. |
| ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु. |
| ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु. |
| ❑ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु. |
| ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु. |
| ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु. |
| ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु. |
| ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. बेडेकर | ३० रु. |
| ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु. |
| ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु. |
| ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |
| ❑ हिंदुधर्मांची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु. |
| ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक ध.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




